॥ श्रीरामसमर्थ ॥

# सहावा सुमनहार

( १ ) " सहावा सुमनहार " पुरा करावा लागत आहे. कारण, छापखान्याकडून सूचना आली आहे कीं, मुंबईच्या " दी इंडियन पेपर सेल्स ॲसोसिएशन " च्या मतानें " श्री रामदास आणि रामदासी " मासिक हें " अगदीं च आवश्यक " या सदरांत येत नसल्यामुळें या मासिकासाठीं कोणत्या हि स्वरूपाचा कागद ॲसोसिएशनकडून छापखान्याला मिळणार नाहीं, असें ॲसोसिएशननें कळविलें आहे. हिंदुस्थान सरकारच्या " कंट्रोलर ऑफ प्रिंटिंग आणि स्टेशनरी " या अधिकाऱ्याकडून आम्हांला " आवश्यकतेचें शिफारसपत्र " ( Essentiality Certificate ) मिळाल्यास, कलकत्त्याच्या एकाद्या गिरणींतून आपण जरूर तो कागद पुरविण्याची तजवीज करूं, असें आश्वासन ॲसोसिएशननें दिलें आहे. त्या दृष्टीनें प्रयत्न सुरू आहेत. त्यांचा निर्णय काय होतो तें रामदासी मासिकाच्या वाचकांना कळविण्यांत येईल च.

( २ ) या हारांत तेरा लेखकांचीं २१ सुमनें आहेत. त्यांपैकीं ७ सुमनें एकट्या रा. कारखानीसांनीं पुरविलीं. नुसत्या श्रीसमर्थ-सांप्रदायिक वाङ्मयाचा च नव्हे, तर इतर हि साधुसंतांच्या वाङ्मयाचा रा. कारखानीसांनीं कसा सूक्ष्म अभ्यास केला आहे, हें त्यांच्या लेखांवरून स्पष्ट दिसून येतें. पांचव्या सुमनहारापासून

रा. कारखानीसांच्या अभ्यासाचा उपयोग रामदासी मासिकाच्या वाचकांना होऊं लागला. "श्रीसमर्थहृदय" ग्रंथ वाचून त्यांना आलेल्या चौदा शंका या ग्रंथांत दोन हप्त्यांनीं देण्यांत आल्या आहेत. त्या बहुतेक- सगळ्या अशा आहेत कीं, त्यांच्यामुळें आपल्या ग्रंथांत हृदयकारांनीं श्रीसमर्थांच्या हृदयाचा जो आविष्कार केला आहे, त्याला यत्किंचित् हि बाध येत नाहीं. बाकी या शंकांचा हि विचार कोणी तरी सवडीनें केला पाहिजे. हृदयकार या च सुमनहारांत आपलें म्हणणें मांडणार होते, पण हार एकदम पुरा करावा लागत असल्यामुळें रा. कारखानीसांच्या शंकांचें समाधान योडें लांबणीवर पडत आहे. नाइलाज आहे.

( ३ ) शेवटच्या लेखांत रा. कारखानीसांनीं "श्री तुकाराम महाराजांचे गुरु कोण ?" हा महत्वाचा प्रश्न उत्पन्न केला आहे. मात्र त्याबद्दलचें आपलें निश्चित मत त्यांनीं दिलेलें नाहीं. जेथें रा. कारखानीसांनीं तें देण्याचें टाळलें, तेथें आम्ही काय करणार ? या ग्रंथांतील ११ व्या लेखांत रा. कारखानीस यांनीं च श्री समर्थ व श्री तुकोबाराय यांच्या दोन अभंगांतील विलक्षण साम्य दाखविलें आहे. या साम्यावरून श्री समर्थ आणि श्री तुकाराम महाराज यांचा गुरुशिष्यसंबंध अनुमानितां येईल काय ? सहज मनांत आलें म्हणून या गोष्टीचा उल्लेख केला इतकें च. या असल्या शंकांचा आणि प्रश्नांचा निर्णय तज्ज्ञांनीं आणि अभ्यासकांनीं च दिला पाहिजे. ती आमची शक्ति नव्हे.

( ४ ) या सहाव्या सुमनहारासाठीं लेख पुरविणाऱ्या सर्व च सज्जनांचे आम्ही ऋणी आहोंत. रामदासी मासिकावर आणि सत्कार्योत्तेजक सभेवर त्यांचे हे उपकार झाले. सर्वांची अशी च कृपादृष्टि निरंतर असावी, अशी प्रार्थना आहे. आमचें काम, महाराष्ट्रांतील लेखकांचा माल त्यांच्याकडून गोळा करून महाराष्ट्रवाचकांच्या घरीं पावता करण्याची "हमाली" करण्याचें ! फार तर असें म्हणतां येईल कीं, महाराष्ट्रांतील लेखकांनीं दिलेलीं आपलीं "सुमनें" त्यांच्याकडून घेऊन, त्यांचा हार गुंफून, श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं तो हार अर्पण करणाऱ्या पुजाऱ्याचें ! एवढें

च आमचें काम आहे, आणि तेवढें तरी जन्मभर, आणि तें हि अखंड, करण्यास मिळावें, एवढी च आमची इच्छा आहे. अंतरींचा हेतु निवेदीत असावा, तो पुरविण्याचें काम त्यांचें !

( ५ ) आज इतकें खरें कीं, अकरा मण्यांचा एक एक सर, या प्रमाणें ज्या अकरा सरांची माळ श्रीसमर्थांच्या कंठीं विराजलेली आपल्याला पहावयाची आहे, त्या माळेच्या चौथ्या सरांतील हा अकरावा मणी, म्हणजे च श्री रामदास आणि रामदासी ग्रंथमालेंतील चवेचाळिसावा भाग—श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला सहावा सुमनहार—आजच्या मंगल दिनीं महाराष्ट्रास सादर होत आहे.

१८६४ श्री दत्तजयंती
दि. २२-१२-१९४२

गणेश शंकर देव



## ॥ श्रीसद्गुरुस्तवन ॥

अगा ये देवा तुजवांचुनी । येथें कोण आहे मजलागुनी ।
धांव धांव गा मोक्षपाणी । सद्गुरुराया ॥ १

तुझिया कृपेवीण जनीं । पडिलों मी भवबंधनीं ।
विषयपाशकामव्यसनीं । गुंतलों सुटेन कैसा ॥ २

प्राणोत्क्रमण अवस्था । तेवीं झुरतसे परमार्थी ।
मी पावन होईन आतां । हें कैसेनि घडे ॥ ३

देवा तूं होसी कृपाळु पूर्ण । ऐसें आइकिलें माहिमान ।
त्याची प्रतीत अंतःकरण । मानी च ना कांहीं ॥ ४

होसी तूं अनाथसाह्यकारी । दीनबंधु भक्तकैवारी ।
पवित्रपावन लोकोत्तरीं । विख्यात विरुदें तुझीं ॥ ५

तूं शरणागतवत्सल । तूं कृपांबुधि कृपाळ ।
मज न पवसी कां केवळ । कठीण मन केलें ॥ ६

निर्वाण मांडलें मज आतां । त्वरें धांव घालूनि ये समर्था ।
तव कटाक्षामृतें तत्त्वता । अजरामर करी ॥ ७

आतां न होतां तुझें दर्शन । करीन मी प्राणविसर्जन ।
या चि निश्चयें करूनि पूर्ण । प्राण समर्पू पाहतों ॥ ८

अष्ट हि भावें येसंडत । पडतों मिचेष्टित दंडवत ।
'देवा दयाळा' हा अखंडित । येशरीस चाळा लागला ॥ ९

देवा धांव रे पाव रे वेगें । कोठें गेलासी रे सांगे ।
तुझें व्यापकपण वाउगें । वर्णिलें नेणों वेदादिकीं ॥ १०



# ( १ )

॥ नारायणस्मरण ॥

## श्रीसमर्थांच्या सदाचाराचा विमर्श

( लेखक – श्री शंकरानंद भारती, धुळें )

समर्थभक्त माननीय नानासाहेब देव यांच्याशीं बोलण्यांत असें समजलें कीं, पहिला सुमनहार, रामदास आणि रामदासी याचे तीन अंक २३२, २३६ व २३७ व तसेंच संशोधक मासिक धुळें यांतील विद्वद्वर्य तात्यासाहेब भट यांचा लेख या सर्व पुस्तकांत श्रीसमर्थांनीं आचरण केलेल्या कांहीं गोष्टींविषयीं समर्थभक्त सत्यजिज्ञासु विद्वानांनीं लेख लिहून कांहीं शंका–उत्तरें प्रश्न व प्रतिप्रश्न प्रतिपादन केलेले आहेत. तें वाचून पहा अशी नानासाहेबांनीं सूचना दि केली. त्याप्रमाणें हीं पुस्तकें वाचल्यावर पुनः श्री. नानासाहेब यांचें व माझें भाषण झालें. त्यानंतर त्यांचे च सूचनेवरून दिनांक १२।४।४२ रोजीं राजवाडे मंदिरांत एतद्विषयक जाहीर भाषण झालें. त्यानंतर श्री. नानासाहेबांनीं सुचविलें कीं, या भाषणाचें तात्पर्य ज्यांत आहे असा लेख रामदास आणि रामदासी याकरितां लिहून द्यावा; म्हणून हा प्रयत्न केला आहे. विद्वान् लोकांनीं धर्मशास्त्रदृष्ट्या परीक्षण करावें अशी नम्र विनंती आहे.

शंकाप्रतिशंका, उत्तरें व प्रत्युत्तरें या सगळ्यांतून निघणारीं विवादस्थलें माझ्या मतें सहा आहेत.

( १ ) रामदास हें नांव,

( २ ) समर्थांचा आश्रम कोणता,

( ३ ) पक्वान्न भिक्षेच्या ऐवजीं कोरान्न भिक्षा सुरू करणें,

( ४ ) स्त्रियांना पतिशिवाय इतरांचें शिष्यत्व स्वीकारतां येतें का ? व इतरांचें गुरुत्व अंगीकारतां येतें का ?

( ५ ) ब्राह्मणांशिवाय इतरांनीं गुरुत्व करावें काय ?

( ६ ) समर्थांचा वेष, कुबडी, कुबडी, मेखला इत्यादि ह्यांत प्रमाण काय ?

हे सर्व विषय धर्मशास्त्रांतील असल्यामुळें ( १ ) धर्मशास्त्रप्रणयन कोणत्या दृष्टीनें झालें, ( २ ) त्यांतील विधिनिषेधांचें प्रतिपादन कोणत्या तऱ्हेनें केलें जातें, ( ३ ) कोणत्या अंशांमध्यें त्यांतील प्रतिपादनाचा विरोध दोषावह आहे, व कोणत्या अंशांत नाहीं, ( ४ ) धर्मशास्त्र ही संज्ञा कोणत्या वाङ्मयाला आहे, व ( ५ ) धर्मशास्त्रांत केवळ विधायक किंवा निषेधक वाक्यें च असतात अगर तीं असून स्वरूपबोधक वाक्येंही असूं शकतात, इत्यादि गोष्टींचा विचार करणें प्रसंगप्राप्त च आहे.

( १ ) *वर्णाश्रमविहित आचरणानें चित्तशुद्धि* होऊन ती ज्ञानप्राप्तीला साधनीभूत व्हावी, या दृष्टीनें धर्मशास्त्रांचें प्रणयन झालें आहे.

( २ ) लिङ्, लोट् आणि तव्य इत्यादि प्रत्ययांनीं म्हणजे कुर्यात्, कर्तव्य, करोतु इत्यादि स्वरूपांत विधि व न कुर्यात्, मा करोतु, न कर्तव्यम् इत्यादि शब्दांत निषेधांचें प्रतिपादन केलें जातें.

( ३ ) वरील तऱ्हेच्या प्रतिपादनानें सांगितलेले जे विधिनिषेध त्यांचें मनु-स्मृतींतील वाक्याप्रमाणें ' विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् । अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ' ( विहित गोष्टींचें आचरण केलें नाहीं व निंदित गोष्टींचें सेवन केलें व इंद्रियांचा निग्रह केला नाहीं तर मनुष्याला पातित्य येतें व तो प्रायश्चित्तीय होतो. ) अतिक्रमण केलें असतां मनुष्य दोषी होतो.

( ४ ) " श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं वै तु स्मृतिः " या वाक्याप्रमाणें धर्मशास्त्र ही संज्ञा मनु याज्ञवल्क्य पराशर इत्यादिकांच्या स्मृतींना आहे. त्यांच्या टीका वगैरेंना नाहीं. टीकादि ग्रंथ हे विद्वद्ग्रंथ म्हणून मान्य आहेत. म्हणजे स्मृतींचा अर्थ करतांना योग्यायोग्य अर्थाच्या विचाराला त्यांचें साहाय्य घ्यावें. एतदर्थी अभियुक्तोक्ति प्रसिद्ध आहे कीं — स्मृतीनां उपदेशविषयां प्रामाण्यं निबन्धानां तु विचारविषयां ( तात्पर्य — स्मृतींच्या उपदेशाप्रमाणें अक्षरशः वागलें पाहिजे. निबंधांचें म्हणणें विचाराला दिशा दाखविणारें असतें ).

( ५ ) लिङ् लोट् तव्य प्रत्ययांनीं सांगितलेलीं विधायक व निषेधक वाक्यें असून कोठें कोठें - त्या वर्णाश्रमस्थितींतील मनुष्याचा स्वभाव देशकालपरिस्थिति याचा विचार करून केवळ वस्तुस्थितिबोधकही कांहीं वाक्यें असूं शकतात. त्यांचा प्रयोग ते ते ग्रंथकार लिङादिप्रत्ययानें न करितां वर्तमानकालवाचक लट्यादि प्रत्ययानें केलेला असतो. ही गोष्ट धर्मशास्त्रपरिचितांच्या अभ्यासांतील च आहे. म्हणून सर्वत्र प्रसिद्ध असलेलीं उदाहरणें देऊन जागा अडवीत नाहीं. एवंच स्वरूपानुवादि वाक्यांच्या अर्थाचें किंचित् उल्लंघन एखादे *ठिकाणीं दृष्टीस* पडल्यास ते दोष या सदरांत येऊं शकत नाहींत.

याप्रमाणें धर्मशास्त्रविषयाचा प्रासंगिक विचार केल्यानंतर आतां आपण उपस्थ केलेल्या आक्षेपांचा क्रमशः विचार करूं.

(१) 'रामदास हें नांव'. यावर शंका अशी कीं दासान्तं शूद्रस्य ( शूद्राच्या नांवाच्या शेवटीं दास हा शब्द लावावा ) असें असतां समर्थांचें रामदास असें नांव कसें? याचें उत्तर असें कीं, निरनिराळ्या गृह्यसूत्रांत याच अर्थाचीं वाक्यें आहेत कीं – पिता नाम कुर्याद् द्व्यक्षरं चतुरक्षरं वा कृतं कुर्यान्न तद्धितं कुलदेवतादिसंबद्धं पितामहादिनामसंबद्धं वा ।

( तात्पर्य, दोन अक्षरी चार अक्षरी कृत्प्रत्ययान्त देवदत्त वगैरे मुलाचें नांव बापानें ठेवावें. त्यांत कुलदेवता व आजा यांच्या नांवाचा संबंध असावा. ) असें द्व्यक्षरी किंवा चतुरक्षरी नांव ठेवल्यावर ब्राह्मणानें आपल्या नावाच्या शेवटीं – शर्मा हा शब्द, क्षत्रियानें वर्मा हा शब्द, वैश्यानें पालित अथवा गुप्त व शूद्रानें दास हा शब्द लावावा. समर्थांचें नांव बापानें नारायण ठेविलें. त्याला वरील लक्षणें सर्व लागूं पडत होतीं. रामदास हें नांव उपासनेनंतर स्वतः समर्थांनीं अंगिकारलें असावें. एका प्रसिद्ध क्षत्रियाचें नांव दिवोदास हें सर्वपरिचित आहे. त्यापुढें वर्मा लावणें हें योग्य होय. तेव्हां वाचक जाणतील कीं, रामदास या नांवाविषयींची शंका सकारण दिसत नाहीं.

( २ ) 'समर्थांचा आश्रम कोणता'— समर्थ विवाहाचा सावधान हा शब्द ऐकून लग्नमंडपांतून निघून गेले ही गोष्ट सर्वमान्य आहे. कोणत्याही ब्रह्मचाऱ्यानें विद्या व व्रत यांची पूर्ण समाप्ति करून नंतर समावर्तन विधि करावा. समावर्तन ( सोड मुंज ) झाल्यावर पूर्वस्मृतींचें तीन दिवस अशौच धरून विवाह करावा. असा धर्मशास्त्राचा सिद्धांत आहे. तेव्हां समर्थ स्नातक होते. व विद्या-व्रत उभयस्नातक होते. ही गोष्ट धर्मशास्त्रदृष्ट्या कोणालाही नाकबूल होण्यासारखी नाहीं. यावर शंका अशी येते कीं, त्यानंतर आजन्म विवाह केला नसल्यामुळें ते ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी या चार आश्रमांपैकीं कोणत्या आश्रमांत होते? व तसें ते नसल्यास अनाश्रमी झाले किंवा नाहीं व अनाश्रमी झाल्यास 'अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपिद्विजः' या दक्षस्मृतीच्या निषेधाला प्राप्त झाले कीं नाहीं?

याचें उत्तर —

श्रीसमर्थ विद्याव्रत – उभयस्नातक आजन्म होते. ते वरील चार आश्रमांपैकीं नसले तरी अनाश्रमी नव्हते व अनाश्रमी न तिष्ठेत इत्यादि दक्षस्मृतीच्या निषेधालाही ते पात्र नाहींत. कारण स्नातकाचे स्थितीला धर्मशास्त्रांत कोठेंही अवधि ( कालमर्यादा ) लिहिलेला नाहीं. विवाह होईपर्यंत स्नातकानें अमुक नियमानें वागावें असें सर्व स्मृतींत स्नातक प्रकरण या नांवाचें स्वतंत्र प्रकरण करून सांगितलें आहे. तसेंच पारस्करगृह्यसूत्रांत स्नातकस्य यमान् वक्ष्यामः असें म्हणून स्नातकाचे नियम दिलेले आहेत व त्या नियमांचा व स्नातकपणाचा अवधि ( कालमर्यादा ) कोणत्याही ग्रंथांत सांगितली नाहीं. सर्व ग्रंथांत विवाहपर्यंत

स्नातक असा शब्द वापरला आहे. समर्थांना विवाह करून लोककल्याणाला प्रतिबंध घालावयाचा नव्हता. म्हणून ते आजन्म स्नातक राहिले व स्नातकाच्या नियमांनी वागले म्हणून तें त्यांचें वागणें धर्मशास्त्राशीं विरोधि झालें नाहीं. अनाश्रमी न तिष्ठेत ही दक्षस्मृति स्नातक प्रकरणांतील नसून ज्या गृहस्थाची पत्नी दिवंगत झाली त्यानें संन्यास न घेतां तसाच गृहस्थाश्रमरहित जर तो राहिला तर त्याचा निषेध करणारें हें वाक्य आहे. कारण याज्ञवल्क्य स्मृति दाहयित्वाग्निहोत्रेण स्त्रियं वृत्तवतीं पतिः इत्यादि वाक्यानें मृत पत्नीचें और्ध्वदेहिक करून तावडतोब दुसरा गृहस्थाश्रम स्वीकारावा व अग्नि ग्रहण करावा. तें न करणाराला हा निषेध आहे. ब्रह्मचारी किंवा सोडमुंज झालेल्या स्नातकाला हा निषेध ऽनवस्थास दिनमेकं या पदाला स्वारस्य रहात नाहीं. कारण कोणलाही स्नातकाला कांहीं दिवस तरी अनाश्रमी राहिलें च पाहिजे व तसा तो रहावा असें त्याच्या विषयींतील नियम सांगणाऱ्या शास्त्रकारांचें मनोगत दिसतें. खरें म्हणजे दक्षस्मृतींतून हें वाक्य स्नातकपर आहे असें सिद्ध करून दिल्याशिवाय स्नातकाला हें वाक्य लावणें निरर्थक ठरेल.

( ३ ) पक्वान्न भिक्षेच्या ऐवजीं कोरान्न भिक्षा सुरू करणें – उभयपक्षमान्य वाक्य – ' यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ ' या वाक्यामध्यें ब्रह्मचारी व संन्यासी यांनाच पक्वान्न ( शिजलेलें अन्न ) भिक्षा सांगितली आहे. श्रीसमर्थ स्नातक असल्यामुळें स्नातकाला ययाचलीं प्राप्त अन्न कोरान्न अगर शिजविलेलें घेण्याचा निषेध नसल्यामुळें त्यांनीं कोरान्नही घेतलें. कारण पक्वान्न घेण्याचा ( शिजलेलें अन्न घेण्याचा ) प्रसंग एकाच वर्णाकडे येईल आणि यांना तर सर्व वर्णीयांची परिस्थिति पाहून कल्याण करावयाचें असल्यामुळें त्यांनीं धर्मशास्त्राशीं विरोधी नसलेलें कोरान्न ग्रहण केलें. स्नातकानें सामान्यतः ब्राह्मणधर्मांशीं सुसंबद्ध असें अन्नवस्त्रादि ग्रहण करावें याचा धर्मशास्त्रांत निषेध नाहीं.

( ४ ) स्त्रियांना पतीशिवाय इतरांचें शिष्यत्व स्वीकारतां येतें कां ? व इतरांचें गुरुत्व अंगीकारितां येतें कां ? ही शंका उत्पन्न करणारांनीं ' पतिरेव गुरुः स्त्रीणाम् ' हें मनुस्मृतींतील वाक्य उपोद्बलक म्हणून दिलें आहे. परंतु हें वाक्य स्त्रियांनीं विवाहाला उपनयन समजून वेदाध्ययन कर्तव्य असतां पतीजवळच वेदाध्ययन करावें इतरांकडे करूं नये या अर्थाचें आहे. याचेपूर्वी पूर्वकल्पांत स्त्रियांना उपनयन, वेदाध्यापन, गायत्रीचा दुसऱ्याला उपदेश करण्याचा अधिकार होता. प्रमाण वाक्य – ' पुराकल्पे तु नारीणां मौञ्जीबन्धनमिष्यते । अध्यापनं च वेदानां सावित्रीवाचनं तथा । पुढें मौंजीची चाल बंद होऊन मुलींच्या विवाहाला मौंज समजूं लागले त्यावेळीं पतीजवळ वेदाध्ययन करावें अशा अर्थाचें हें वरील वाक्य आहे. यामुळें स्त्रियांनीं केलेल्या नाममंत्राकरितां गुरुत्वाचा निषेध संभवत नाहीं व तसेंच त्यांनीं नाममंत्रांचा उपदेश दुसऱ्यास करण्याचा निषेधही संभवत नाहीं.

( ५ ) ब्राह्मणाशिवाय इतरांनी गुरुत्व करावें काय ? याचें उत्तर असें कीं — वैदिकमंत्राला त्रैवर्णिक असण्याची अवश्यकता आहे. नाममंत्रोपदेशाला कोणत्याहि वर्णाला निषेध नाहीं.

( ६ ) समर्थांचा वेष, हुर्मुजी वस्त्रें — कुबडी — मेखला इत्यादिकांस प्रमाण काय ? — स्नातक स्वरूपतः कसा असूं शकेल याचें वर्णन स्नातक प्रकरणांत पांढरें वस्त्र धारण करणारा — केश कर्तन करणारा वगैरे सर्व स्मृतींत लिहिलें आहे. तो स्वरूपानुवाद आहे, त्याला विधायकत्व नाहीं. कारण ब्राह्मण शुक्लवस्त्र नेसणाराच असावा असें गृहस्थाश्रम्याचें वर्णन आहे. गृहस्थाश्रमी हा स्नातकाला जवळचा असल्यामुळें त्याच गोष्टींचा अनुवाद स्नातकधर्मांत आहे. समर्थांना विशिष्ट परिस्थितींत धर्मस्थापनेच्या हेतूनें हुर्मुजी पोषाख घेणें देशकाल-दृष्टीनें जरूर वाटलें; त्यामुळें तो वेष त्यांनीं घेतला त्यांत ते धर्मशास्त्रीला दोषी होऊं शकत नाहींत हें विहितस्याननुष्ठानात् इत्यादि वाक्यांवरून ध्यानांत येईल. कुबडी वगैरे योगस्थितीला साधक पदार्थ त्यांनीं योगदृष्ट्या अंगीकारिले त्यांत धर्मशास्त्राचा प्रश्न च नाहीं.

याप्रमाणें माझें नम्र मत मी सुज्ञ व विमर्शशालि जनतेपुढें ठेविलें आहे. विचारी लोक त्याचा विचार करतील.

दिनांक २७ – ४ – १९४२

# श्रीरामदासानुष्ठितमार्गविचारः

( याडांक २३७ तील )

श्रीरामचन्द्राय नमः । नमस्कृत्य जगन्नाथं कलौ कलिविधिं नवं । करिष्ये बालबोधार्थं कृष्णोऽहं कृष्णसंश्रयः ॥ स्वस्ति श्रीनृपशालिवाहनशके १६६० गतकलौ ४८३९ कालयुक्तसंवत्सरे श्रीमज्जगन्नाथादिसमस्तरामदासीशिष्यार्चितः श्रीमत्पण्डितमण्डनशिरोमण्युपनामकः कालभास्करः श्रीकृष्णः विदुषां मुदे रामदासानुष्ठितमार्गविचारं तनुते । समवलोकयन्तु मात्सर्यमुत्सृज्य दयालवः साधवः । तत्र, दीर्घकालं ब्रह्मचर्यं नरमेधाश्वमेधकौ । इमान्धर्मान् कलियुगे वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥ इति कलियुगे वर्ज्यत्वाद्दीर्घब्रह्मचर्यस्य रामदासानुष्ठितो मार्गः उच्छास्त्रः । अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः । दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः । मां चैवान्तःशरीरस्थं तान्विध्यासुरनिश्चयान् ॥ इति भगवता भगवद्गीतायां निषिद्धमार्गसंश्रयणादश्रद्धेयोऽयं मार्ग इति केचिदाहुः ॥ अत्रोच्यते । नायं ब्रह्मचर्याश्रमः स्वाधेन वर्ज्यः स्यात् । किन्तु परिव्राडाख्यश्चतुर्थाश्रमभेदः परमहंसवनिषेधरहितः । द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनौ । परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥ इति स्मृतिप्रतिपाद्यः । न च दण्डकाषायमात्रेण यतिः पूज्यो न संशयः इति पूज्यतावच्छेदकाभावादपूज्याश्रम इति वाच्यम् ॥ अग्निहोत्रं गवालम्भं संन्यासं पलपैतृकम् । देवराच्च सुतोत्पत्तिः कलौ पञ्च विवर्जयेत् । इति कलिवर्ज्यत्वात्तद्भेदोयमग्न्याधानवत् ॥ तत्रायं संग्रहश्लोकः । निषिद्धं काषायं श्रुतिगदितमार्गेषु विधियुक् । न संन्यासस्तस्य प्रतिनिधिरयं रामपदगः । न नम्यो गुर्वन्यो ह्युपनयनमारभ्य विरतौ । परिव्राडाख्यातः कलिमलसुविश्लेषजनकः ॥ १ ॥ दशामी न प्रकीर्तिता इति काषायवस्त्रयुक् नम इव श्रौतस्मार्तकर्माधिकारी न । संन्यासस्तु निषिद्धः । *ननु, यावद्वर्णविभागोऽस्ति यावद्वेदः प्रवर्तते । संन्यासश्चाग्निहोत्रं* च कलौ तावत्प्रकीर्तितम् ॥ विशेषविधिश्रवणादग्निहोत्रवत्संन्यासोऽपि विधेयः । इति वाच्यम् । आयुराशास्ते सुप्रजास्त्वमाशास्ते इत्यादि तदस्यात्तदप्यादिलन्तेन होत्रा स्योनोमान फलस्यादर्शनात्त विप्रकर्षेण श्रुतिर्वेदस्य । अत एव गाथाप्रायाश्च वै

वेदा भविष्यन्ति कलौ युगे इत्यादि वदता भगवता वेदव्यासेन प्रकटीकृतोऽयमुपरिष्टादाशयः। न चात्र कारणं किमिति वाच्यं आचारहीनं न पुनन्ति वेदाः इत्यस्यैव प्रमाणत्वादाचाराभावोऽपि कुत इति चेत्। कलौ दशसहस्रान्ते विष्णुस्त्यक्ष्यति मेदिनीं। तदर्धं जान्हवीतोयं तदर्धं सर्वदेवताः इति स्मरणात्। न च पूर्वं सर्वदेवताः क्वावस्थिताः कुतो गता इति वाच्यम्। यावती वै देवतास्ताः सर्वा वेदविदि ब्राह्मणे वसन्ति। तस्माद् ब्राह्मणेभ्यो वेदविद्भ्यो दिवे दिवे नमस्कुर्यात् नाश्लीलं कीर्तयेदेताषदेव देवताः प्रीणातीति ब्राह्मणशरीरे देवतापगमात् कलौ एव नाशेवामाचरन्ति नीचब्राह्मणा अतो देवतासांनिध्याभावादाचाराभावः। न चापूज्यतापत्तिरिति वाच्यं। कलौ स्थानानि पूज्यन्ते इति विधिबलाद्विश्वेश्वरादिवत् देवतास्थानत्वात् ब्राह्मणाः पूज्याः। अत एवं कलौ तावद्भविष्यन्ति शिस्नोदरपरायणाः। कुपिताः किं करिष्यन्ति निर्विषा इव पन्नगाः। इति भविष्योत्तरवचनाच्चोक्तोर्थः सिध्यति इति। कलौ कियत्कालं संन्यासाग्निहोत्राद्यनुष्ठानमितिचेदुच्यते। चत्वार्यब्दसहस्राणि चत्वार्यब्दशतानि च। कलौ यदा गमिष्यन्ति तदा त्रेतापरिग्रहः॥ संन्यासश्च न कर्तव्यो ब्राह्मणेन विजानता। न च दशसहस्रवर्षपर्यन्तं विष्णुः क तिष्ठति येन वा कर्मणा मोक्ष इति वाच्यम्। नाहं वसामि इति श्लोकः॥ कृतादिषु प्रजा राजन् कलाविच्छन्ति सम्भवम्। यत्र संकीर्तनान्नॄणां हरिर्दास्यत्यसम्भवम्। इत्यादि वदता भगवता वेदव्यासेन प्रकटीकृतोऽयमाशय इति दिक्। ननु संन्यासाग्निहोत्रानुष्ठानं निषिद्धं वेदाचरणाभावापत्तिरिति चेत् न। शिष्टाचारस्यापि पंचमप्रमाणत्वादधोधानसंन्यासादि कुर्वन्ति। अघोघानवदयं रामपथगः रामदासमार्गवृत्तिः आश्रमः परिव्राडिति। तत्र प्रमाणं। यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वेति श्रुतिस्मृतिप्रतिपाद्योऽयं रामपथगः रामपंथानं गमयत्येवायं रामदासमार्गः इति सर्वमनवद्यमिति संक्षेपः॥ इति श्रीपण्डितमण्डनशिरोमण्युपनामककालग्रामस्थमोगल्योपनामकश्रीकृष्णविरचितः रामदासमार्गविचारः समाप्तः॥



( ३ )

॥ श्रीसमर्थप्रसन्न ॥

# श्री समर्थांचें तत्त्वज्ञान*

**( लेखक – रा. तुकाराम जयराम केदार, ॲडव्होकेट, नागपुर )**

भरतखंडाच्या इतिहासांत समर्थ रामदासांचें स्थान व योग्यता फार मोठी आहे. जुन्या परंपरेप्रमाणें अद्वितीय धर्मगुरूंच्या पुरुषास शककर्ता म्हणून संबोधण्यांत येतें. श्रीसमर्थ हे अवतारी पुरुष तर होते च, पण ते शककर्ते (epoch – maker) हि पण होते. आजच्या प्रसंगीं या दृष्टीनें श्री समर्थांच्या चरित्राचें अवलोकन करावयाचें ठरविलें आहे.

श्रीसमर्थांच्या पूर्वीच्या जवळ जवळ ३०० वर्षांचा काळ मुसलमानी अमदानीचा होऊन गेला. या काळांत सहाजिकपणें मुसलमानी धर्माची व संस्कृतीची छाया हिंदुधर्मावर व संस्कृतीवर पडल्याशिवाय राहिली नाहीं. वारकरी पंथ या छायेखालीं च उत्पन्न झाला व वाढला. मुसलमानी धर्मांतील कडवेपणा हिंदूंना जसा जसा तीव्रपणें बोचूं लागला तसतसा हिंदुधर्मांतील लोकांना स्वधर्म टिकविण्याचा प्रयत्न जास्त उमेदीनें व निश्चयानें करावा लागला. मुसलमानी धर्माचें रहस्य निर्मळ एकेश्वरी वादांत व सामुदायिक पूजेंत – congregational worship – आहे. त्यांच्या एकेश्वरी वादांत परमेश्वराच्या अन्य स्वरूपांचा समावेश होत नसल्यामुळें तद्धर्मीय लोकांना एका स्वरूपापलिकडे जाण्याची मुभा ठेवलेली नाहीं. त्या च प्रमाणें सामुदायिक पूजा हि जवळ जवळ सक्तीची मानण्यांत आली असल्यामुळें धर्मबंधनें जास्त जास्त घट्ट होऊं लागलीं व स्वधर्माविषयींचा मुसलमानांचा हेका अधिकतर बलवान होऊं लागला.

हिंदुधर्मांतील उपास्यांच्या बाबींतील मोकळेक समाजांतील धर्मनिष्ठा कमजोर करूं लागली. प्रत्येक व्यक्तीला आपली स्वतंत्र देवपूजा करण्याची परवानगी

---

* नागपुर विश्वविद्यालयाचे उपकुलगुरु रा. तुकाराम जयराम उर्फ नानासाहेब केदार यांनीं धुळें येथें ता. २८ मे १९४२ रोजीं श्रीसमर्थवाग्देवता-मंदिराच्या अष्टमवर्षारंभसमारंभाचे अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण

वारकरी पंथांतील भक्तजन गोळा होत असत व भजनकीर्तनाचा आनंद मनमुराद लुटीत असत. अजून हि ही प्रथा चालू आहे च.

परंतु या पंथांतील वैगुण्य हें की, यांत संघटना नाहीं. व्यक्तीनें स्वतःवर निर्बंध घालून प्रतिवर्षी पांडुरंगाच्या दर्शनास जावयाचें व परत आल्यावर आपआपल्या ठिकाणी भजनकीर्तनाचें महात्म्य वाढवावयाचें. स्वतःला वारकरी म्हणवून घेतल्यावर त्या व्यक्तीच्या जीवनाचा कार्यक्रम हि उदात्त ठेवावा लागतो, ही जाणीव हि पण असते च, व अजून हि वारकरी लोकांची खेड्यापाड्यांतून सत्शील व सत्य वक्ते म्हणून यरीच किंमत आहे.

मुसलमानी धर्मांत हि संघटनेचा अभाव आहे च, पण या अभावामुळें त्या धर्मांतील लोकांची धर्मबंधनें शिथिल होऊं शकलीं नाहींत. याचें कारण हें दिसतें की, त्यांचें उपास्य एकमेवाद्वितीय आहे. दुसरीं उपास्यें खोटीं, अशी त्या सर्वांची समजूत असते. विचारवंत बुद्धीला ही न पटणारी गोष्ट आहे. वारकरी पंथांतील लोकांना ही कल्पना केव्हां हि पटली नाहीं व कोणा हि हिंदुमात्राला ती पटणार नाहीं. यामुळें धर्मबंधनें मजबूत ठेवण्याकरितां हिंदूंना संघटनेची जरूर भासते. जेव्हां दुसऱ्याचें हि उपास्य समान दर्जाचें वाटूं लागतें व अन्य उपास्याची भक्ति हि धारण्या च किंमतीची भासूं लागते, तेथें स्वधर्माचें रक्षण संघटनेशिवाय होऊं शकणार नाहीं.

सामुदायिक पूजा ही मुसलमानी धर्मानें शोधून काढलेली नवी कल्पना नव्हे. मुसलमानांच्या पूर्वी हि खिस्ती लोकांची ती कल्पना होती व त्यांच्या हि पूर्वी बुद्धधर्मीय लोकांची ती मूळ कल्पना होती. पर्यायानें या कल्पनेचा उगम भरतखंडांत च येतो. फरक इतका च कीं, बुद्धधर्माचा ऱ्हास झाल्यावर बौद्ध भिक्षूंनीं परदेशांत नेलेल्या कल्पनेचा विकास परभूमींत झाला व बौद्धांनीं पेरलेलें बीज या च भूमींत नष्ट झालें. मुसलमानी आक्रमणाच्या मागोमाग तें परत भरतभूमींत आलें. बुद्धधर्मीय लोकांचे संघाराम, मठ, धर्मप्रचारक इत्यादि संस्था जगभर विश्रुत आहेत. या च संघटनेच्या जोरावर, बुद्धकालीन राष्ट्रीवर बुद्धधर्माचा प्रभाव पडला. कालांतरानें अनेक पंथ निर्माण होऊन निरनिराळे संघाराम स्वतंत्र झाले, त्यांच्या भांडणांत संघटना नष्ट झाली व त्यामुळें बुद्धधर्म लयास गेला.

वारकरी पंथानें धर्मजागृति केली, सामुदायिक पूजा अस्तित्वांत आणली; एका च उपास्यावर भर देऊन लोकांना अनन्यगामी केलें; सामाजिक व व्यावहारिक जीवनांत क्रांति घडवून आणून व्यक्तींचें चारित्र्य निर्मळ व उदात्त केलें; दिंड्या, भजनें, कीर्तनें इत्यादिक उपायांनीं धर्मकल्पना दृढ व सतेज केल्या; मुसलमानी सत्तेचा जाच सहन करण्याची शक्ति वाढली; परमेश्वरावरील निष्ठा वाढून

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥

या भगवदुक्तीवरील विश्वास अढळ व्हावयास लागला; परमेश्वराचा अवतार खास होईल ही समजूत दृढमूल झाली; वेळ फक्त यावयाची आहे. अशी परिस्थिति महाराष्ट्रांत निर्माण झाली.

परकीय सत्तेचे अनेक दुष्परिणाम असतात. परंतु त्या बरोबर स्वतंत्र होण्याची भावना हि जसजसा परकीय सत्तेचा जाच अधिक अधिक असह्य होऊं लागतो, तसतशी अधिक अधिक प्रदीप्त होऊं लागते. ही भावना विशेष प्रदीप्त होण्याकरितां सामाजिक जीवनास निराळें वळण मिळावें लागतें. मनुष्याच्या कृतींतील passivity उदासीनता किंवा केवळ परमेश्वरावर भिस्त ठेवून, कालावलंबी होण्यापेक्षां militantcy अग्रेसरत्व किंवा युयुत्सुपणा उत्पन्न व्हावयास पाहिजे.

वारकरी पंथांत संघटनेचा अभाव होता हें वर दर्शविलें च आहे. वारकरी पंथाचें उपास्य विटेवर उभे राहिलेलें व कमरेवर हात ठेवलेलें समाजाच्या वाढत्या आकांक्षांना व युयुत्सुपणाला कमी पडूं लागलें. लोकांची धर्मजागृति म्लेंच्छांचा उच्छेद कसा होईल, या विवंचनेंत संचार करूं लागली. परमेश्वरानें क्षीरसागरांतील आपलें शयनस्थान सोडून तांतडीनें या भरतभूमीवर येऊन पुन्हा धर्माची व वैभवाची ज्योत प्रदीप्त करावी अशी जाणीव उत्कट व्हावयास लागली. याला निराळें उपास्य, निराळें तंत्र, व निराळी संघटना अवश्य अशी वाटावयास लागली. निवृत्तीचा उपदेश वाढत्या आकांक्षांना अपुरा पडूं लागला. अशा या संक्रमणकाळीं समर्थांचा जन्म झाला, व त्यांनीं वस्तुस्थितीला समर्पक असें उपास्य दिलें, तंत्र दिलें व संघटना केली. दुसऱ्या शककर्त्यांनीं आणखी काय केलें ?

श्री विष्णूच्या पांडुरंग स्वरूपांत व श्रीरामचंद्राच्या स्वरूपांत मी भेद मानतो अशांतला भाग नाहीं. पांडुरंगाचें स्वरूप, निवृत्तिमार्ग, प्राधान्यानें दर्शवितें, तर रामचंद्राचें स्वरूप, प्रवृत्तिमार्ग, प्राधान्यानें दर्शवितें, असा लोकांचा समज आहे. माझा हि पण तसा च आहे. यमुना आणि गंगा यांची तुलना करितांना कविवर्य मोरोपंताला जसें वाटलें तसें हि वाटण्याचा संभव आहे. पंतांची खालील उक्ति प्रसिद्ध च आहे.

जनानुभव मी कथी मजसि नातळो पाप गा ।
तशी न यमुना गमे जशी गमे निर्लिपापगा ॥

कोदंडपाणी रामचंद्र हें श्रीविष्णूचें militant युयुत्सु स्वरूप. रावणाचा संहार करून राज्य करणारा प्रभु रामचंद्र; त्या च बरोबर

स्नेहं दयां च सौख्यं च यदिवा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥

हें तत्त्व बाळगून त्याप्रमाणें चालणारा प्रभु रामचंद्र – हें उपास्य कोणत्या मुमुक्षु जनतेस आवडणार नाहीं ?

कदाचित् श्रीसमर्थांच्या कुळांत श्रीरामचंद्र हें च उपास्य दैवत असल्यामुळें उपास्याची निवड सहजासहजीं झाली असेल. स्वतः समर्थ च म्हणतात :

आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।

परंतु तें उपास्य जनतेसमोर ठेवून त्या उपास्यानें दर्शविलेल्या भूमिकेवर, जनतेला आणून ठेवण्याचें, महत् कार्य करण्याला समर्थ च लागतात.

निवृत्ति मार्गांतील साधुसंतांचें एक वैशिष्ट्य दिसून येतें. त्यांना एक प्रकारची आध्यात्मिक वंशावळ, किंवा गुरुसंप्रदाय, लागत असतो. भक्तिविजयांतील नामदेवाची कथा सुप्रसिद्ध च आहे. नामदेवाला अखेरीस गुरु करावा लागला. त्याशिवाय आध्यात्मिक पूर्णता प्राप्त होणें शक्य नाहीं. पण शक्तें बहुधा स्वयंभू असतात. समर्थांच्या संबंधानें हि मला असें च वाटतें. समर्थांनी गुरु केला नाहीं. त्यांना मारुतीच्या देवळांत साक्षात्कार झाला. याचा अर्थ माझ्या दृष्टीनें हा आहे कीं, समर्थांची योजना स्वयंस्फूर्तीनें निघालेली आहे, सांप्रदायिक पद्धतीनें नाहीं. व्यक्तीला जेथें आत्मविश्वास करून घ्यावयाचा आहे तेथें मार्गदर्शक गुरु लागेल. गुरुशिवाय चालणार नाहीं असें वाटत नाहीं. परंतु मुख्यातीला तरी गुरु हवा. पण जेथें व्यक्तींचा संबंध जनतेशीं येतो व जनता कार्यक्षम करावयाची असते तेथें स्वयंस्फूर्तीनें चालणारा व वागणारा पुढारी लागतो. समर्थांपुढें जें कार्य होतें तें या सदरांतील होतें, म्हणून त्या कार्याला योग्य असा गुरु निवृत्तिपंथांतून निघणें अशक्य होतें.

समर्थांचें तत्त्वज्ञान माझ्या दृष्टीनें वारकरी पंथाच्या तत्त्वज्ञानाहून अगदीं भिन्न होतें. समर्थांनीं सांगितलेलें तत्त्वज्ञान समर्थांच्या अगोदर निदान २००।३०० वर्षे तरी भरतखंडांतील जनतेच्या दृष्टीसमोर नव्हतें. भारतीय युद्धाचे आरंभीं अर्जुनास कर्मयोग सांगताना, श्रीकृष्णास स्पष्टपणें सांगावें लागलें कीं, जो कर्मयोग तुला सांगावयाचा आहे तो फार प्राचीन काळीं अनेकांस विदित होता, परंतु कांहीं काळ किंबहुना बराच काळ तो लुप्त झाला होता. प्रत्यक्ष परमेश्वरानें हा प्रथम सूर्याला सांगितला. सूर्यानें तो मनूला सांगितला. मनूपासून इक्ष्वाकूस मिळाला. इक्ष्वाकूपासून अनेक राजर्षींनीं तो ग्रहण केला.

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥

कदाचित् कर्मयोगाचें तत्त्वज्ञान जुनें असेल, पण त्याची श्रीकृष्णानें केलेली मांडणी नवीन होती. त्या च प्रमाणें श्रीसमर्थांचें तत्त्वज्ञान जुनें असेल, पण त्याची समर्थांनीं केलेली मांडणी नवीन होती. ज्याप्रमाणें श्रीकृष्णाला कर्मयोग शास्त्राचा प्रवर्तक व त्या नात्यानें, शककर्ता म्हणून मानावें लागतें, त्याप्रमाणें श्रीसमर्थांना सुद्धा त्यांनीं जनतेपुढें ठेवलेल्या राजपंथा बद्दल शककर्ता म्हणून मानलें पाहिजे.

भक्तिमार्ग हा परमेश्वर प्राप्तीचा राजमार्ग किंवा राजपंथ आहे हें अनेक साधुसंतांच्या उक्तींवरून व अनुभवावरून सिद्ध करून देतां येईल. पण समर्थांचा राजपंथ हा हरिकथानिरुपण, राजकारण, सावधपण व साक्षेप या चार सिद्धांतांवर घसविलेला आहे.

> मुख्य हरिकथानिरुपण । दुसरें तें राजकारण ।
> तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥
> चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।

ही मांडणी अगदीं नवीन होती. राजकारण शब्द हा अलिकडे इतका परिचित झाला आहे कीं, त्या शब्दानें उत्पन्न केलेल्या कल्पना समर्थांच्या तत्त्वज्ञानांत घुसविण्याचा मोह अनावर होतो. Politics या शब्दानें प्रतीत होणारा राजकारण शब्द, समर्थांच्या दृष्टीसमोर नव्हता हें खास. राजकारणाचा पर्याय " व्यवहार " असें शकेल, पण हा शब्द फार व्यापक अर्थानें वापरावा लागेल. राजकारण, सावधपण व अत्यंत साक्षेप उर्फ बल या तिन्हीं कल्पनांचा एक समुच्चय होऊं शकेल व तो कदाचित् व्यवहार शब्दानें द्योतित होईल. हा त्रिशाखात्मक व्यवहार कदाचित् प्रपंच या सदराखालीं येऊं शकेल. म्हणजे हरिकथानिरुपण हा परमार्थ व ह्या परमार्थाच्या बरोबरीनें दाखविलेला प्रपंच या दोहोंची सांगड घालणारें तत्त्वज्ञान श्रीसमर्थांपासून जनतेसमोर आलें.

आपल्या सांप्रदायिकांना समर्थांनीं प्रथम परमार्थ व नंतर व्यवहार किंवा प्रपंच सांगितला आहे. पण सर्वसाधारण जनतेकरितां हा क्रम त्यांनीं बदलून प्रथम प्रपंच व नंतर परमार्थ ठेविला आहे.

> आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका ।
> येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥
> प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।
> प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥

यांतील रहस्य सहज उलगडण्यासारखें आहे. सांप्रदायिक म्हणून परमार्थाला प्रथम स्थान देणें आवश्यक होतें. रामदासी पंथ हा धार्मिक पंथ आहे.

धर्मसंस्थापनेकरितां या पंथाचा जन्म झाला व त्या पंथाच्या कार्यक्रमानुसार धर्माचें पुनरुज्जीवन व्हावें हा बाणा सांप्रदायिकांनीं पाळणें अवश्य होतें. असें करतांना व्यवहाराशीं अगदीं रुसून बसण्याची जरुरी नाहीं, हें हि पण तितक्या च कंठरवानें सांगणें इष्ट होतें. उलटपक्षी व्यक्तींची व समाजाची प्रापंचिक उन्नति झाल्याशिवाय परमार्थ साधूं शकत नाहीं हें निश्चितपणें सांगण्याचें अलौकिक धैर्य समर्थांनीं दाखविलें. इतरेजनांना नेटका प्रपंच हा त्यांनीं मुख्यत्वेंकरून उपदेशिला आहे.

हा प्रपंच नेटका करण्याकरितां प्रत्येक व्यक्तीस झटावें लागतें व श्रेष्ठ प्रतीचे गुण संपादन करावे लागतात. समर्थांचा ' श्रेष्ठ ' पुरुष किंवा ' उत्तम पुरुष ' हा super - man अतिमानुष या सदराखालीं येणारा पुरुष होय. समाजांत जेव्हां supermen म्हणजे श्रेष्ठ पुरुषांची संख्या वाढत जाते, तेव्हां च समाजाचा जीर्णोद्धार होतो. समर्थांच्या अगोदरच्या संतांची दृष्टि अध्यात्मांतील श्रेष्ठ पुरुषांना निर्माण करण्याची होती. प्रपंचांत राहून श्रेष्ठ पुरुष ज्या घाटीं निर्माण होतात त्या घाटाची थोरवी काय वर्णावी ? समर्थांचे श्रेष्ठ पुरुष आकाशांतून एकदम खालीं पडणाऱ्या श्रेष्ठ व्यक्ति नव्हत. अत्यंत प्रयत्न करून घडविलेल्या त्या मूर्ति होत. समर्थांनीं आपल्या प्रभावी भाषेनें लोकांना कळविलें कीं,

> केल्यानें होत आहे रे । आधीं केलें चि पाहिजे ॥
> येत्न तो देव जाणावा ।

नाना प्रकारचे अवगुण वर्ज करून, अनेक सद्गुण संपादन करून बनलेल्या या श्रेष्ठ पुरुषांना समर्थांनीं जो आदेश दिला आहे, तो अत्यंत महत्त्वाचा आहे.

> ऐसा जो माहानुभाव । तेणें करावा समुदाव ।
> भक्तियोगें देवाधिदेव । आपुलासा करावा ॥
> आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें ।
> या कारणें भजनास लावावे । बहुत लोक ॥

या श्रेष्ठ पुरुषांचें कार्य लोकसंग्रह करण्याचें आहे. सतत प्रयत्न करतांना दृष्टि मात्र एका अढळ बिंदूवरून स्खलित होऊं नेय या करितां समर्थांनीं

> सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।
> परंतु येथें भगवंताचें । अधिष्टान पाहिजे ॥

हा बहुमोल संदेश लोकांना दिला. भगवंताचें अधिष्टान प्रत्येक चळवळींत पाहिजे. तें नसलें तर ती चळवळ जिवंत रहाणें शक्य नाहीं. समाजाला जिवंत व ओजस्वी ठेवण्याकरितां श्रेष्ठ पुरुषांना चळवळी करणें जरूर आहे. परंतु जोपर्यंत भगवंताचें

कार्य चालविण्याकरितां आम्ही निमित्तमात्र आहोंत व तें कार्य चालविणें आमचें पवित्र कर्तव्य आहे ही जाणीव व श्रद्धा उत्पन्न होत नाहींत, तोंपर्यंत त्या चळवळींत जोम व शक्ति उत्पन्न होऊं शकत नाहीं.

हें तत्त्वज्ञान आत्मप्रत्ययाच्या कोंदणांत बसविणें जरूर आहे. हा समर्थांचा आग्रह सर्वांनीं विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. प्रचीतीशिवाय व्यक्ति किंवा समुदाय कार्यक्षम होऊं शकत नाहीं. बुद्धि, शक्ति, यत्न किंवा साक्षेप आणि सावधपण या गुणांचा समुच्चय झाला म्हणजे साधकाच्या आंगीं प्रचीती बाणते. पर्यायानें बोलावयाचें म्हणजे या गुणांचा अनुभव पटल्यावर जो अखंड आत्मविश्वास उत्पन्न होतो, तो कांहीं हि करूं शकतो. सारांश, पुरुषाची श्रेष्ठतम वाढ, साक्षेप, सावधपण, प्रचीति इत्यादि मार्गांनीं कशी होते हें खालील ओंव्यांत समर्थांनीं मोठ्या मार्मिकतेनें दर्शविलें आहे.

> पाहतां पाहतां जाणे । जाणतां जाणतां कळे ।
> कळतां कळतां शिके । शिकतां शिकतां करी ।
> करितां करितां वाढे । वाढतां वाढतां भला ॥

समर्थांना, प्रचीति आंगीं बाणलेले श्रेष्ठ पुरुष निर्माण करावयाचे होते. नवीन मन्वंतर याशिवाय कोणत्या दुसऱ्या पायावर कोणी निर्माण केलें ?

जगाचा इतिहास पाहिला तर कोणती हि सामुदायिक चळवळ तत्त्वज्ञानाच्या अभावीं यशस्वी झाली नाहीं. सतराव्या शतकांतील अमेरिकन स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांनीं " All men are made equal " ( मानवांची समता ) या श्रीदवाक्यानें दर्शविलेल्या तत्त्वज्ञानावर भिस्त ठेविली. फ्रान्सच्या राज्यक्रांतींत " Liberty, Equality and Fraternity " स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वत्रयावर समाजाची उभारणी झाली पाहिजे हें तत्त्वज्ञान बाहेर पडलें. हिंदवी राज्याच्या स्थापनेच्या काळीं भगवद्भक्ति, राजकारण ऊर्फ नेटका व्यवहार, साक्षेप ऊर्फ अत्यंत यत्न, आणि सावधपणा या चतुःसूत्रीवर उभारलेलें तत्त्वज्ञान श्रीसमर्थांच्या वाङ्मयांतून प्रगट झालें. या तत्त्वज्ञानावर हिंदुसमाज आजवर जिवंत राहिला व समर्थांच्या आज्ञेप्रमाणें श्रेष्ठ पुरुष निर्माण करूं शकला तर समर्थांना अपेक्षित असा ' जगदोद्धार ' व्हावयाला वेळ लागणार नाहीं.

( ४ )

॥ श्री ॥

# सातपुड्याच्या परिसरांतील मारुतिराय

( लेखक – प्रिन्सिपाल दामोदर केशव ओक, बी. ए., नागपुर )

**श्रीसमर्थ रामदास** यांनीं सर्व भरतखंडांत संचार करून ठिकठिकाणीं मठ स्थापन केले, असे त्यांनीं एकंदर ११०० मठ स्थापिले, अशी प्रसिद्धी आहे. परंतु ' श्रीसमर्थचरित्र ' कार रा. आळतेकर यांस ही अतिशयोक्ति असावी, असें वाटतें. वस्तुतः या बाबतींत ' आकाशांतील चांदिण्या तुला मोजवतना, मला मोजवतना ' अशी स्थिति आहे. कारण ऐतिहासिक साधनांच्या अभावीं भरतखंडाचा नकाशा काढून त्यांत मठांचीं ठिकाणें दाखविणें शक्य नाहीं. तेव्हां कोणी कांहीं म्हटलें तरी तें निमूटपणें मान्य करणें भाग आहे. परंतु समर्थांनीं व त्यांच्या महंतांनीं गांवोगांव मारुतीची स्थापना केलेली आढळते आणि तीवरून **मठांची संख्या ११०० असणें आम्हाला अशक्य वाटत नाहीं.**

समर्थांनी प्रथम ११ मारुतींची स्थापना केली. परंतु पुढें त्यांना जी संघटना करावयाची होती तिच्या सिद्धीसाठीं त्यांनीं मारुतीच्या उपासनेचा इतका प्रसार केला कीं, डोंगर, पर्वत, दऱ्याखोरीं, दाट अरण्यें वगैरे ठिकाणीं मारुतीची स्थापना केलेली या करविलेली आढळते. बुद्धीचा सागर व जितेंद्रिय इत्यादि गुणांनीं संपन्न अशा दैवताचा प्रसार करण्यांत समर्थांचा हेतु भरतखंडांतील तरुणांनीं मारुतीसारखे

---

( १ ) श्रीसमर्थचरित्र, पृष्ठें १६८ व २०२ पहा. ( २ ) " मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् । वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥ ३३ " ( श्रीरामरक्षास्तोत्र ) तसेंच " हरीभक्त तो शक्त कामास मारी । जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥ " ( श्रीसमर्थांचा मनोबोध ).

पराक्रमी व शीलसंपन्न व्हावें असा होता आणि म्हणूनच त्यांनी हा अचाट व अफाट उद्योग आरंभिला. **समर्थांच्या यशाची खरी गुरुकिल्ली त्यांनी मोठ्या प्रमाणावर केलेल्या मारुतिरायांच्या भजनपूजनाच्या प्रचारांत आहे.**

आम्ही मागें एका प्रसंगीं सातपुड्यांतील डोंगरामधील सोमवारीपेठ नांवाच्या खेड्याजवळील महावीरजीच्या ( मारुतीच्या ) मूर्तीचा उल्लेख केला आहे. तशाच आणखी पुष्कळ प्राचीन मूर्ति सातपुड्याच्या आसपासच्या प्रदेशांत आढळतात. त्यांतील कांहीं थोड्यांची अल्पस्वल्प माहिती मिळाली ती श्रीसमर्थचरणीं सादर करण्यास आम्हास फार आनंद वाटतो।

## उमरावती जिल्हा

**( १ ) धनोडी** हा गांव मोर्शी तालुक्यांत आहे. तेथें काळ्या पाषाणाचा आठ फूट उंचीचा मारुती आहे. ह्या देवस्थानाला मोठें उत्पन्न असून हनुमंत-जयंतीचा उत्सव मोठ्या थाटानें होत असतो. त्याची व्यवस्था तेथील देशमुख पाहातात.

( २ ) उमरावती तालुक्यांतील खोलापुरजवळ दारापुर हा गांव आहे. त्याच्याजवळ च **शिंगणापुर** हें लहानसें खेडें आहे. तेथें मारुतीची प्रसिद्ध मूर्ति पाहण्यासारखी आहे. ती काळ्या पाषाणाची असून तिची उंची सुमारें १० फूट आहे. **ही मूर्ति रामदासांनीं स्थापन केली, असें म्हणतात.** ह्या देवस्थानची जमीन वगैरे मालमत्ता पुष्कळ असून उत्पन्नही मोठें आहे. देवालयाजवळून पूर्णानदी वाहते, यामुळें तेथील देखावा पाहाण्यासारखा आहे. हनुमंतजयंति व रामजयंति हे उत्सव मोठ्या प्रमाणावर होतात. ह्या देवस्थानची व्यवस्था गांवचे पाटील, पंचांच्या मदतीनें, पाहातात. देवस्थानाला इनामें वगैरे कोणाकडून मिळालीं तें कळत नाहीं. तथापि देवाच्या पुजाऱ्यांजवळ जुनीं कागदपत्रें सांपडणें शक्य आहे.

**( ३ ) गावनेर – तळेगांव** हा गांव उमरावती तालुक्यांत असून उमरावती – यवतमाळ रस्त्यावर नांदगांव – खंडेश्वरपासून ९ मैलावर आहे. येथें एक मारुतीचें प्राचीन देवालय असून त्यांतील मूर्तीची उंची ५ फूट आहे. देवस्थानास थोडें फार उत्पन्न आहे. ह्या गांवाचें जुनें नांव **शिंगणापुर** असें होतें.

---

( १ ) श्री रामदास आणि रामदासी, अंक २३१, श्रीसमर्थचरणीं समर्पण केलेल्या ' पांचवा सुमनहार ' यांतील आमचा लेख ' बैतुलजवळील श्रीसमर्थांच्या तपश्चर्येचें स्थान ' हा पहावा.

( ४ ) उमरावतीपासून ४१५ मैलांवर **नांदगांवपेठ** ह्या गांवीं मारुतीचें एक पुरातन देवालय आहे. त्याला कांहीं इनाम आहे. येथें हनुमंतजयंतीचा उत्सव होतो. ह्या देवस्थानास ' जपे यांचें देऊळ ' असें म्हणतात.

( ५ ) चांदूर तालुक्यांत कौंडण्यपुरापासून ४१५ मैलांवर **जहागीरपुर** येथें ४ फूट उंचीची पण ६ फूट रुंदीची अशी एक मारुतीची मूर्ति आहे. ह्या मारुतीचा उत्सव कार्तिकांत होतो. हा मारुति वाढत आहे, असें म्हणतात.

( ६ ) मोर्शी तालुक्यांत सालबर्डीजवळ **पाळें** म्हणून एक गांव आहे. तेथें एका च गांवांत, जंगलांत, ११ पेक्षां ज्यास्त मारुतींचीं देवळें धन्यावाईट स्थितींत आहेत. त्यांतील एका मारुतीची उंची ८ फुटांपेक्षां ज्यास्त असावी.

पूर्वीं हें एक शहर असून तें एखाद्या राजघराण्याच्या राजधानीचें ठिकाण असावें, अशी लोकांची कल्पना आहे. येथील पाटील व पटवारी मुसलमान असून त्यांस देशमुखीचें वतन आहे. यावरून ह्या गांवाचा इतिहास महत्वाचा असावा, असें वाटतें.

( ७ ) **इलीचपुर** येथें श्री. देशमुख यांच्या वाड्याजवळ **राममठ** आहे. **त्याची स्थापना खुद्द समर्थांनीं केली, असें म्हणतात.** ह्या मठांतील मारुतीची मूर्ति गायीच्या शेणाची आहे, असें म्हणतात. ह्या मठास चांगलें इनाम असून रामनवमीचा उत्सव फार मोठा होतो.

येथें रामपुऱ्यांत सर्पिणनदीच्या कांठीं आणखी एक काळ्या पाषाणाची मारुतीची मूर्ति आहे.

## यवतमाळ जिल्हा

( ८ ) **राणी उमरावती** हा गांव धामणगांव-यवतमाळ रस्त्यावर, इवळा नदीच्या कांठीं, बाभूळगांवपासून ४ मैलांवर आहे. ह्या गांवाला तट आहे. ह्या गांवांत महादेवाची पिंडी आहे. एवढी मोठी पिंडी व तिच्यासमोरचा एवढा मोठा नंदी वऱ्हाडांत दुसऱ्या कोठेंही नाहीं.

ह्या गांवांत व त्याच्या जवळपास १४ पेक्षां ज्यास्त मारुति असून त्यांतील एक फार च मोठा आहे. हें ठिकाण फार च प्रेक्षणीय आहे, असें समजतें.

---

( १ ) पुणें येथील भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचें त्रैमासिक-अंक ५३, ( आषाढ, शके १८६० ) यांतील आमचा लेख ' एक अप्रसिद्ध संत देवधाम ' – पृष्ठें १६–१९ पहा. ( २ ) श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं वाहिलेला ' दुसरा सुमनहार ' यांतील रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे यांचा ' श्रीसमर्थांचा सातपुड्यांतील संचार ' या लेखाचीं पृष्ठें ९–१० पहा.

(९) दारव्हा तालुक्यांत **तरोडा** येथें अडाणनदीच्या कांठीं ओव्यावर एक १० फुटांपेक्षां जास्त उंचीचा मारुति आहे. ह्या ओव्याला १० पायऱ्या आहेत. दरवर्षी दिवाळीच्या पाडव्याला ( गोक्रीडन ) ह्या मारुतीच्या पायऱ्या पडावयास गांवांतील गाईंना घेऊन जातात. तो समारंभ पाहाण्यास पुष्कळ लोक जमतात. इतर वेळेस गाई ह्या पायऱ्या चढूं शकत नाहींत, अशी समजूत आहे.

## अकोला जिल्हा

(१०) अकोटपासून ८ मैलांवर सातपुडा पर्वतराजींतील एका डोंगरावरील सुरम्य स्थानीं '**वारीच्या हनुमंता**'ची स्थापना केलेली आहे. ही मूर्ति ६ फुटांपेक्षां ज्यास्त उंचीची आहे. **ह्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा समर्थांनीं केली, असें म्हणतात.** हें स्थान जंगलांत असल्यामुळें व्याघ्रादि हिंस्र श्वापदांची भीति फार आहे. हें ठिकाण वाणनदीच्या कांठीं आहे.

विदर्भांतील सत्पुरुष देवनाथमहाराज ( जन्म शक १६७६; निर्याणशक १७४३ ) ह्यांची ह्या मारुतीच्या ठिकाणीं अत्यंत निष्ठा असे व ते वारीच्या ( वारी हें एक खेडें आहे ) हनुमंताच्या दर्शनास वारंवार जात असत.

## छिंदवाडा जिल्हा

(११) संवसर तहसिलींत **सावळी** ह्या गांवीं जांबनदीच्या कांठीं एक १० फूट उंचीची मारुतीची मूर्ति आहे. ही एका कुशीवर निजलेली आहे. ( पूर्वी कधींतरी नदीला मोठा पूर येऊन ह्या मूर्तीच्या खालच्या ओटा वाहून गेल्यामुळें मूर्ति अशी पडली असावी. ) मारुतीराय दमल्यामुळें श्रमपरिहारार्थ निद्रासुख घेत आहेत, अशी समजूत आहे.

येणेंप्रमाणें आम्हांस मिळालेली माहिती वर दिली आहे. ती फार त्रोटक आहे. परंतु तींत समर्थभक्तांनीं भर घालावी, न्यून असेल तें पूर्ण करावें, ह्या हेतूनें हा प्रयत्न केला आहे. उपरिनिर्दिष्ट मारुतीरायांखेरीज आणखी किती तरी आहेत व इतिहासाच्या दृष्टीनें त्यांतील कांहीं महत्वाचेही असतील. म्हणून समर्थभक्तांनीं आस्थापूर्वक संशोधन करून यथा रीतीनें त्यांचा जीर्णोद्धार करावा अशी विनंति आहे.

मागील एका लेखांत आम्ही समर्थ भक्तांस (बेतुलजवळील) शिंगणवाडीचा परिचय करून दिला आहे. समर्थांच्या चरित्रांत चाफळजवळील शिंगणवाडीचें महत्व आहे. तसेंच समर्थांच्या संबंधामुळें शिंगणापुर ह्या नांवांतही कांहींतरी मोहक आकर्षकता आहे, असें दिसतें.

---

(१) रा. रा. यांचा 'समर्थांचा सातपुड्यांतील संचार' हा लेख-विशद सुमनहार, पृष्ठें ८ व ९ पहावा. (२) 'बेतुलजवळील समर्थांच्या तपःश्चर्येचें स्थान' हा 'पांचव्या सुमनहारां' तील आमचा लेख पाहावा.

ठिकठिकाणच्या मारुतींसंबंधीं वर जी माहिती दिली आहे तींत दोन शिंगणापुरांचा उल्लेख आहे. एक दारापुर येथील व दुसरा गावनेर — तळेगांव येथील. आपल्या गांवांत मारुतीची स्थापना करून त्या स्थानाच्या आसपासच्या भूभागाला ' शिंगणापुर ' असें नांव देण्यांत समर्थांविषयीं पूज्य भाव व शिंगणवाडी ह्या समर्थांच्या आवडत्या स्थळाच्या नांवाचें अनुकरण करण्याची सत्पुरुषांची इच्छा हीं दिसून येतात. समर्थांनीं सर्व भरतखंडवासी जनांचीं मनें अगदीं आपलीशीं कशीं करून घेतलीं होतीं, हें ह्यावरून दिसून येतें.

लेखनकाळ
श्रीहनुमंतजयंति, शके १८६४
तारीख १ एप्रील १९४२

प्रसिद्धीकाळ
१८६४ श्रावण शुद्ध ४
ता. १६-८-१९४२



# (५)

## श्रीसमर्थांचा परमार्थ *

( लेखक–रा. स. या. कुळकर्णी, बी. ए., एल्‌एल्. बी., भुसावळ )

देह परमार्थी लाविलें । तरी च याचें सार्थक जालें ।
नाहीं तरी हें वेर्थ चि गेलें । नाना आघातें मृत्यपंथें ॥ १-१०-६१

भुसावळ येथील सुविद्य नानासाहेब ऊर्फ गोपाळराव गोगटे ह्यांनी रामदास आणि रामदासी मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या " तिसरा सुमनहार " या ग्रंथांतील " बहुधा अध्यात्म निरोपण " या आपल्या लेखांत प्रतिपादिलें कीं, समर्थांनीं आपली बैठक बहुतेक अध्यात्मावर ठेवून त्या दृष्टीनें सर्व शिष्यवर्ग तयार केला, व अशा शिष्यवर्गें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं पेरून कार्य केलें. तसें च आपल्या लेखाच्या शेवटीं वे. शा.

---

* सदरचा लेख लिहून झाल्यानंतर प्रथम रा. गोगटे यांना च दाखविला. त्यांनी तो वाचून दुसरे दिवशीं लोकमान्यांचें गीतारहस्य, वे. शा. सं. सदाशिव शास्त्री भिडे यांचें मुण्डकोपनिषद्, व तिसरा सुमनहार अशीं पुस्तकें मला दिलीं व गीतारहस्याचीं ३७६ व ३७७ हीं पृष्ठें, मुण्डकोपनिषदाचीं १२२ ते १२५ हीं पृष्ठें व तिसऱ्या सुमनहारांतील वे. शा. सं. श्रीधरशास्त्री पाठक ( धुळें ) यांचा त्याच बाबतींतील लेख वाचण्याविषयीं सुचविलें. वाचकांनीं देखील हे सारे संदर्भ पहावेत. रा. गोगटे यांनीं आपल्या लेखांत ग्रंथस्थान ठेवण्याचें कारण असें समजतें कीं, लेख लिहितेवेळीं वे. शा. सं. सदाशिव शास्त्री भिडे विद्यमान होते, व त्यांनीं आपल्या अधिकारी लेखणीनें त्याबद्दल विशेष खुलासा करावा अशी रा. गोगटे यांची इच्छा होती. परंतु ती पूर्ण होऊं शकली नाहीं व आतां तर भिडे शास्त्री ब्रह्मस्वरूपीं लीन झाले असल्यामुळें ती मुळीं च पूर्ण होऊं शकत नाहीं. तथापि या बाबतींत रा. गोगटे स्वतः खुलासा करणार आहेत असें त्यांनीं मला कळविलें आहे. अशा परिस्थितींत दुसऱ्या अधिकारी इसमाकडून त्यांनीं स्वतः च पूर्वपक्ष मांडून उत्पन्न केलेल्या शंकेचें निवारण उत्तर पक्ष मांडून व्हावयाचें आहे, एवढें च मी वाचकांना कळवितों. रा. गोगटे यांनीं वाचकांची इच्छा लवकर च तृप्त करावी, अशी माझी त्यांना विनंति आहे. — लेखक

पं. सदाशिवशास्त्री भिडे यांचा उतारा देऊन मायावादापासून हिंदुस्थानाचें शेवटीं मुकसान च झालें आहे व समर्थ हे मायावादी असतांना त्यांनीं त्यांच्या पिढींत अलौकिक कर्तृत्व व जागृति कशी निर्माण केली अशी शंका उपस्थित केली आहे. रा. गोगटे यांच्यासारख्या सुविद्य व सुसंस्कृत माणसाविरुद्ध कोणते हि रीतीनें टीकात्मक प्रत्युत्तरादाखल लेख लिहिण्याचा माझा मानस नाहीं, इतकें च नव्हे तर त्यांच्या इतक्या उत्तम लिखाणास माझें म्हणणें पूरक च झालें तर पहावें या दृष्टीनें सदरचें माझें मत मी प्रदर्शित करीत आहे.

मायावाद अथवा विवर्तवाद या सारखें उत्तम तत्त्वज्ञान आजपावेतों निर्माण झालेलें नाहीं व त्याचें खंडन आजपावेतों कोणी हि केलेलें नाहीं व पुढें हि कदाचित् कोणी करूं शकणार नाहीं, असा लोकमान्यांचा गीतारहस्यांतील उतारा रा. गोगटे यांनीं आपल्या लेखांत दिलेला आहे. अर्थात् लोकमान्यांना हि विवर्तवाद मान्य होता हें निर्विवाद आहे. एकूण समर्थांबरोबर लोकमान्य हि विवर्तवाद मान्य असणारे ठरतात, परंतु वस्तुस्थिती अशी कीं, दोघे हि कर्मावर जोर देणारे आहेत. लोकमान्यांनीं तर सर्व अध्यात्माची मांडणी च कर्मयोगावर उभारली आहे. दोघे हि मायावादाचा अंगिकार करणारे असतांना त्यांनीं लोकोत्तर कामें कशीं केलीं अशी शंका येणें सयुक्तिक दिसतें, परंतु थोडा विचार केला असतां त्याचा खालीलप्रमाणें खुलासा करितां येईल.

सर्व अध्यात्माची मांडणी व कार्य पाहिलें तर असें दिसून येईल कीं, जीवात्म्याचें परमात्म्यांत म्हणजे च स्वार्थाचें परमार्थांत रूपांतर करणें हें होय. म्हणून व्यष्टि व परमेष्टि, तसेंच प्रपंच व परमार्थ ह्यांचा मेळ समर्थांनीं कसा घातला आहे, याचें बारकाईनें निरीक्षण केल्यास वरील शंकेचें निरसन होण्यासारखें आहे. जीवाचें व ब्रह्माचें ऐक्य हें जरी अध्यात्माचें कार्य असलें, तरी अशा रीतीनें नराची नारायण होण्याची पात्रता फक्त नरदेहाच्या च ठिकाणीं आहे, इतरत्र नाहीं. समर्थांनीं च :

धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहो ।
जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १-१०-१

अशी फक्त नरदेहाची च पात्रता सिद्ध केली आहे.

येणेंप्रमाणें नरदेहाचें श्रेष्ठत्व प्रतिपादन केल्यानंतर " जन्म दुःखाचा अंकुर । " सांगण्याचें प्रयोजन काय असा प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे, परंतु त्याचें उत्तर असें कीं, नरदेहांत जशी नराचा नारायण होण्याची पात्रता आहे, तसें च नरदेहांत स्वतःचा अधःपात करून घेण्याची हि शक्यता आहे. ज्याप्रमाणें अग्नीमुळें उत्तम पाकनिष्पत्ती करतां येते, तसें च लोकांचीं घरें हि जाळतां येतात. त्याचप्रमाणें चांगल्या बुद्धीनें आत्मप्रचिती होते व वाईट बुद्धीनें अधःपात हि होत असतो. समर्थांच्या च शब्दांत सांगावयाचें म्हटलें तर,. .

खोटें तें खोटें चि खोटें । खऱ्यासी तगेनात वाटे ।
मन अधोमुख उरफाटें । केलें पाहिजे ॥ २०-९-१७

तसें च,

सूत गुंतलें तें उकलावें । तैसें मन उगवावें ।
मानत मानत घालावें । मुळाकडे ॥ १९

समर्थांनी आत्मप्रचिती होण्याची स्पष्ट रीत येथें सांगितली आहे. आतां हें मूळ कोणतें व मन उफराटें कसें करावें यासंबंधीं श्रीमत् भगवद्गीतेंतील पंधराव्या अध्यायांतील " ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।" वगैरे श्लोकांवरून दिसून येतें कीं, परमब्रह्मरूपी वृक्षाचीं मुळें इतर झाडांप्रमाणें खालीं नसून वर आहेत व खालीं विस्तार होत गेलेला आहे; मुळाकडे जावयाचें असल्यास मनाची गति अधो न ठेवितां ऊर्ध्व म्हणजे वर ठेविली पाहिजे, तर च मुळाचा शोध लागेल, एरवीं नाहीं; मनाची गति अधोमुख राहिल्यास संसारचक्रांत जीवात्मा अधिक अधिक गुरफटत जातो.

अधोमुखें भेद वाढतो । ऊर्ध्वमुखें भेद तुटतो ।
निःसंगपणें निर्गुणी तो । माहा योगी ॥ २०-३-२२

पुढील विवेचनासाठीं मनाच्या ऊर्ध्व व अधोगतीसंबंधीं थोडेसें विस्तारानें सांगणें लागलें आहे. समर्थांनी जीवाच्या अधोगतीसंबंधानें सांगतांना मनुष्याच्या शरीरास दगडमातीनें बांधिलेल्या निर्जीव घराची उपमा देऊन त्याप्रमाणें घरावर नाना तऱ्हेचे कृमिकीटक, सर्पविंचू, मूषकमित्र, आणि इत्यादि आपला ताबा सांगून हक्क प्रस्थापित करितात व सर्व च माझें माझें म्हणतात, परंतु वस्तुतः घर कोणाचें हि एकट्याचें नसतें; तद्वत् च मानवी शरीर हें माझें माझें म्हणणाऱ्या एकट्या जीवात्म्याचें नसून त्यावर पुष्कळांची सत्ता असते.

ऐसें शरीर बहुतांचें । मूर्ख म्हणे आमुचें ।
परंतु खाजे जिवाचें । तापत्रें वोढिलें ॥ ३-१०-६०

येणेंप्रमाणें समर्थांनी मनाच्या अधोगतीचें विवरण केलें आहे. ऊर्ध्वगतीसंबंधीं समर्थांचें काय म्हणणें आहे तें पहा :

देहे मळांचें फळ । देहे दुखाचें चि केवळ ।
परी या देहास निर्मळ । उमजवावें ॥ १८-४-२४

देहाकरितां हरिहानपोर । परिती आमुचाचे व्यापार ।
हरिरमर्थे हरिहानपोर । विती देह ॥ २५

जे जे देहे धरुनी आले । ते ते कांहीं करून गेले ।
हरिभजनें पावन जाले । किती येक ॥ २६

अष्टधा प्रकृतीचें मूळ । संकल्परूप चि केवळ ।
नाना संकल्पें देहेफळ । येऊन आलें ॥ २७

हरिसंकल्प मुळीं होता । तो चि फळीं पाहावा आतां ।
नाना देहांतरीं तत्वता । शोधितां कळे ॥ २८

वेलाचे मुळीं बीज । उदकरूप वेली समज ।
पुढें फळामधें बीज । मुळींच्या अंतरीं ॥ २९

मुळाकरितां फळ येतें । फळाकरितां मूळ होतें ।
येणेंकरितां होत जातें । भूमंडळ ॥ ३०

असो कांहीं येक करणें । कैसें घडे देहाविणें ।
देहे सार्थकीं लावणें । म्हणिजे बरें ॥ ३१

आत्म्याकरितां देहे जाला । देहाकरितां आत्मा तगला ।
उभययोगें उदंड चालिला । कार्यभाग ॥ ३२

चोरून गुप्तरूपें करावें । तें आत्मयासी पडे ठावें ।
कर्तृत्व याचेन स्वभावें । सकळ कांहीं ॥ ३३

देहामधें आत्मा असतो । देहे पूजितां आत्मा तोषतो ।
देहे पीडितां आत्मा क्षोभतो । प्रत्यक्ष आतां ॥ ३४

देहाविगळी पूजा पावेना । देहाविण पूजा फावेना ।
जनीं जनार्दन म्हणोनी जना । संतुष्ट करावे ॥ ३५

उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर ।
तेथें च पूजेस अधिकार । पुण्यशरीरीं ॥ ३६

सगट भजन करूं येतें । तरी मूर्खपण आंगीं लागतें ।
गाढवासी पूजितां कळतें । काये त्याला ॥ ३७

पूज्य पूजेसी अधिकार । उगे चि तोषवावे इतर ।
दुखऊं नये कोणाचें अंतर । हाणिजे बरें ॥ ३८

सकळ जगदांतरींचा देव । क्षोभतां राहाव्या कोठें ठाव ।
जनाविगळा जनास उपाव । आणीक नाहीं ॥ ३९
परमेश्वराचे अनंत गुण । मनुष्यें काये सांगावी खूण ।
परंतु अध्यात्मग्रंथ श्रवण । होतां उमजे ॥ ४०

येणेप्रमाणें जनताजनार्दनाची सेवा ही च खरी ईश्वरसेवा, व तें च आध्यात्मिक कर्तव्य समर्थांनीं सांगितलें आहे. अशा रीतीनें जनताजनार्दनाच्या सेवेसाठीं जें कर्म होतें तें च मनाच्या ऊर्ध्वगतीचें लक्षण झालें. परंतु येथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, जर संसार व हें दृश्य जग हीं मृगजळाप्रमाणें मिथ्या अथवा स्वप्नवत् आहेत, तर संसारीक क्रिया तरी कां कराव्यात? ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या असें ठरल्यानंतर सेवा कोणाची व कां करावी? प्रश्न दिसतो तितका बिकट नाहीं.

समर्थांनीं जनक, शुकमुनि व व्यास वगैरेंचीं उदाहरणें देऊन मुक्त झालेनंतर हि ते लोकसंग्रहाकरितां कर्मे करीत च राहिले असें सांगितलें आहे. अशा परिस्थितींत होणारी क्रिया ही केव्हां हि स्वार्थी अगर फलेच्छा धरून होणारी असूं शकत नाहीं. शरीर अगर देह हा एकट्याचा च नसून त्यावर पुष्कळांची सत्ता आहे असें एकदां पटल्यानंतर जी जी क्रिया होईल, ती सर्वांच्या हिताची अशी होईल, अगर त्यामुळें पुष्कळांचें पुष्कळ हित साधेल. अशा क्रियेंत स्वतःचें विशिष्ट असें कांहीं एक न राहतां स्वतःचें हित मात्र हटकून होत च राहील. कारण सर्वांच्या हितांत स्वतःचें हित ही अंतर्भूत गोष्ट आहे. वरील प्रश्न समर्थांनीं मोठ्या खुबीनें सोडविला आहे, तो असा कीं, शिष्याचे तोंडीं आशंका घालून ब्रह्मज्ञानी हरम स्थितप्रज्ञ असतो व काष्ठवत् स्थिति झाल्याशिवाय खरें ब्रह्मज्ञान नाहीं असा विवाद्य विषय घेऊन त्याचें निराकरण केलें आहे. तें असें कीं, शुक हा जरी ब्रह्मज्ञानी होता, तरी तो परिक्षितापुढें भागवत बोलिला, तसें च व्यासानें भारत व गीता सांगितली; व जनकानें उत्तम राज्य व प्रपंच केला. जर आपण खाणें, पिणें, झोपणें इत्यादि नित्याचीं कर्मे सोडीत नाहीं, तर सत्कर्मे तरी कां सोडावीं व स्थित व्हावें? थोडक्यांत चलन अथवा स्थिरता ही देहाची उपाधी असून ज्ञानोत्तर स्थितींत त्याचें कांहीं च महत्त्व रहात नाहीं. इतकें च नव्हे तर ज्ञानी मनुष्य नित्य मुक्त असतो. मग तो संसारी असो, स्थित असो, या कसा हि असो. सबब ज्ञानोत्तर कालांत सिद्धाच्या सर्व क्रिया लोकसंग्रहाकरितां च होत असतात व त्यापासून इतर बद्ध जनांनीं धडे गिरवावयाचे असतात.

आधुनिक मानसशास्त्राच्या या विषयाची छाननी केल्यास बरेचसें सार कळण्यासारखें आहे. ज्यास आपण व्यक्तित्व ( Personality ) म्हणतों, तें व्यक्तित्व बऱ्याचशा सजीव व निर्जीव वस्तूंचें बनलेलें असतें. उदाहरणार्थ, माझें

रीतीनें जीवदशेंत नेहमीं अधो व ऊर्ध्व गति ह्यांची स्पर्धा चालू असते. ह्यास च कोणी देव व दैत्य, कोणी ब्रह्म व माया, अशा निरनिराळ्या उपमा देतात. बिचारा जीव मात्र कर्मफल भोगीत असतो. असो. एकंदरींत समर्थांचा परमार्थ लोकसंग्रहांत असून प्रत्यक्ष आहे. समर्थ कर्मप्रधान आहेत, परंतु फलप्रधान नाहींत. फल त्यांनीं रामावर टाकिलें आहे. सतत लोकसंग्रहाचीं कामें करणें, आपले क्रियेपासून जागतिक नीतिमूलक नियम उत्पन्न करणें व जनताजनार्दनास संतोष देणें हा च थोडक्यांत समर्थांचा परमार्थ आहे. तो प्रत्यक्ष आहे. इहलौकिक आहे; थोडक्यांत, रोकडा आहे, उधार नाहीं. कारण, समर्थ हे प्रचितीवर चालणारे आहेत. येणेंप्रमाणें निःसंग राहून फलाची आशा न करतां हि सतत कर्मयोग कसा चालत असतो व त्याला मायावाद कोठें कसा हि आडवीत नाहीं ह्याबद्दलचे मी थोडक्यांत माझे विचार समर्थांनीं दासबोधांत दिलेल्या वचनांच्या आधारें मांडिले आहेत. समर्थांनीं व्यक्तीच्या प्रपंचाची वाढ विश्वाच्या प्रपंचापर्यंत करून विराटापासून अलग मानूं पहाणारा त्याचा च अंश मोठ्या खुबीनें व यथास्थित रीतीनें त्यांत च कसा मिळवून दिलेला आहे, हा चमत्कार पाहिला म्हणजे भगवद्गीतेंतील " यदा यदा हि धर्मस्य... ... " या वचनाप्रमाणें समर्थांसारखे धर्मस्थापनेचे नर हे धर्मग्लानि झाली असतां अगर एकादें उदात्त तत्त्व देशकालभेदानें दीनत्वाला पोंचले असतां त्यास उजाळा देण्यासाठीं च उत्पन्न होतात याची प्रत्यक्ष साक्ष पटते. अगर वर दिलेल्या त्यांच्या च शब्दांत म्हटल्याप्रमाणें

> उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर ।
> तेथें च पूजेस अधिकार । पुण्यशरीरीं ॥

मायावादापासून हिंदुस्थानचें जें अनहित झालेलें आहे, तें त्या वादाच्या तात्विक अशुद्धतेमुळें नसून त्याचा भलता च विपर्यास करून ऐहिकाकडे दुर्लक्ष्य व मरणोत्तर पारलौकिक मोक्षाकडे सर्व नजर ठेविल्यामुळें झालेलें आहे. परंतु यासंबंधीं हि समर्थांनीं स्पष्ट शब्दांत इशारा दिलेला आहे, तो असा :

> प्रपंच सांडोनि परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।
> मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥

समर्थांनी व्यष्टि व परमेष्टि ह्यांचा अन्योन्य संबंध दाखवून दोहोंची सांगड घालून प्रपंचांत च परमार्थ कसा साधतो हें दाखवून दिलें आहे. समर्थांचें तत्वज्ञान जरी मायावादी असलें तरी धगधगीत असून प्रत्यक्ष आहे. आणि अशा रीतीनें मायावादाचे प्रतिपादन केलें गेल्यानंतर लोकशक्ति उफाळून तिचेकडून लोकोत्तर व तेजस्वी कार्य व्हावीत यांत कोणतें च नवल नाहीं.

लेखनकाळ
दि. २१ मे १९४२

प्रसिद्धिकाळ
दि. १६ ऑगस्ट १९४२

( ६ )

# श्रीरामदासांकित दक्षिण हिंदुस्थान

( लेखक – रा. त्रिंबक रामकृष्ण गद्रे,
बी. ए., एल्एल्. बी., वकील, अकोला )

परिच्छेदांचे मथळे : ( १ ) श्रीसमर्थांचें व राजे शहाजींचें गुप्त राजकारण, ( २ ) श्रीरामदासांकित दक्षिण हिंदुस्थान, ( ३ ) श्री रामदासी संप्रदायाचा दक्षिण भारतांत विस्तार, ( ४ ) महंत भीमस्वामींच्या सांनिध्यांत, ( ५ ) महंत भीमस्वामींच्या आणखी सांनिध्यांत, व ( ६ ) श्रीसमर्थमित्र शहाजीराजांच्या समाधीचा जीर्णोद्धार

## ( १ ) श्री समर्थांचें व राजे शहाजींचें गुप्त राजकारण

श्रीसमर्थ रामदास स्वामी भारतवर्षांत तीर्थयात्रा करीत असतांना व तत्कालीन परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करीत होते त्यावेळीं श्री शिवाजी महाराज महाराष्ट्रांत व त्यांचे सापत्न बंधु व्यंकोजी राजे दक्षिण हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करण्याच्या महत्कार्यांत गुंतले होते. या कामीं उभयतांना त्यांचे वडील शहाजी राजे यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष पाठिंबा होता असें अलिकडील इतिहास-संशोधकांचें म्हणणें आहे. तीर्थयात्रा संपवून रामदास रामदास स्वामी तडकाफडकी कृष्णाकांठीं चाफळखोऱ्यांत शिवरायांच्या उद्योगाचा पाठपुरावा करण्यास दाखल झाले व तेथील कार्य करीत असतांना च ते कावेरीकांठच्या उद्योगाचें निरीक्षण व साह्य करण्यास विद्युत्वेगानें तंजावरास जाऊन आले. श्रीसमर्थांच्या अल्प सहवासांत व्यंकोजी राजांची त्यांचे ठायीं अत्यंत भक्ति उत्पन्न झाली व ते आपल्या सद्गुरूंना कावेरीकांठीं च निवास करण्याचा प्रेमादरानें आग्रह करूं लागले. हें कृष्णाकांठचें व कावेरीकांठचें शहाजी राजे व श्रीसमर्थ यांचें गुप्त राजकारण होतें व या राजकारणी व धर्मकारणी महापुरुषांच्या आशिर्वादानें उपरिनिर्दिष्ट क्षत्रिय राजकुमार स्वराज्यप्रवण झाले होते.

## ( २ ) श्रीरामदासांकित दक्षिण हिंदुस्थान

तथापि " महाराष्ट्रराज्य चि करावें । जिकडे तिकडे " असें ध्येय राष्ट्रापुढें ठेवणारे व त्यासाठीं " मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा "

असा मंत्र सांगणारे राष्ट्रगुरु व्यंकोजी राजांची इच्छा अन्य-रीतीनें पुरविते झाले. त्यांनीं आपले तीन अत्यंत आवडते शिष्य श्री भिकाजी बावा शहापुरकर, मौनी बोवा, व राघवदास यांना दक्षिण हिंदुस्थानांत पाठविले. श्री भिकाजी बावांनीं तंजावरास रामदासी मठ स्थापिला, मौनी बोवांनी मन्यारगुडी येथें मठस्थापना केली व राघवदासांनीं तंजावरच्या पूर्वेस मरियम्मागुडीजवळ कोनूर ग्रामीं आपला मठ स्थापन केला. दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्र सारस्वताची, महाराष्ट्र संस्कृतीची व महाराष्ट्र राज्याची संस्थापना व अभिवृद्धि यांची येथून सुरुवात होते. दक्षिण हिंदुस्थानांत रामदासी संशोधनाचें क्षेत्र किती विस्तीर्ण, व्यापक व विपुल आहे व त्याचें पूर्णांशानें संशोधन झाल्याशिवाय श्री समर्थांचें अवतारकार्य आपणांस समजूं शकत नाहीं याची आतां पुष्कळांना जाणीव होऊं लागली आहे. तंजावर, मद्रास व बंगलोरकडील मराठी समाजांत हि अशी जागृति होऊं लागली आहे असा आमचा ताजा स्वानुभव आहे.

## ( ३ ) श्री रामदासी संप्रदायाचा दक्षिण भारतांत विस्तार

श्रीसमर्थशिष्य महंत भीमस्वामी तंजावरकर हे च श्री भिकाजी बावा शहापुरकर होत. यांचा जन्म शके १५६४ चे सुमारास झाला व ते शक १६६२ पर्यंत आपलें कार्य करीत होते. आपल्या सद्गुरूंच्या आज्ञेनुसार ते शक १५९९ च्या सुमारास तंजावरास आगमन करिते झाले, व मठस्थापना करून भक्तिभावानें पूजा, भजन, कीर्तन, भिक्षा या प्रबोधसाधनांचें अवलंबन करून आदर्श गृहस्थाश्रम आचरूं लागले. श्रीसमर्थांनीं त्यांना प्रसाद म्हणून दिलेलें श्रीरामचक्र, श्री मारुतिरायाचें चित्र, मूर्ति, योगदंड इत्यादि आतां हि मठांत पहाण्यास सांपडतात. या मठाच्या तीन शाखा आहेत : ( १ ) श्री गोविंद वल्लभ स्वामी अथवा बहुस्वामी मठ, ( २ ) श्री झोळीराम बावा किंवा देवगोस्वामी मठ, आणि ( ३ ) श्री अण्णाजी बावा अर्थात् आत्माराम गोस्वामी मठ. श्री भिकाजी ( भीमस्वामी ) यांची समाधी वेण्णारला जाण्याच्या रस्त्यावर करंटट्टनगुडी येथें आहे. श्री भीमराज स्वामी यांनीं स्वहस्तें काढलेली श्रीसमर्थांची तसबीर तंजावरच्या मठांत पहाण्यास सांपडते. यांनीं लिहिलेलें श्री समर्थांचें कविताबद्ध चरित्र पुण्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलें आहे. श्री मौनी बोवांनीं हि पदें वगैरे कविता केली आहे. श्री मेरु स्वामी यांनीं "भीमोपदेश", "रामसोहळा", "अवधूतगीता" अशी काव्यरचना केली असून "अनंत पाशिग्रो" या नांवाची नाट्यरचना केल्याचें समजतें. यांचे "रामपोटक" व "रामदास-स्तवन" सर्वांच्या परिचयाचें आहे च.

## ( ४ ) महंत भीमस्वामींच्या सांनिध्यांत

महंत भीमस्वामींच्या सांनिध्यांत थोडा काळ घालवावा, असें वाटतें. औरंगझेबाच्या प्रचंड लाटेला थोपवून धरून व शेवटीं ती परतविण्याचें व मोगल साम्राज्याच्या केंद्रस्थानीं दिल्ली येथें मराठी सत्तेनें सार्वभौमत्व स्थापिण्याचें प्रचंड कार्य मराठ्यांनीं केलें, त्यांत जिंजीकडील अद्भुत कामगिरी विशेष उल्लेखनीय आहे. या कामीं तिकडील रामदासियांनीं जें कार्य केलें त्याचें श्रेय भीमस्वामींना दिलें पाहिजे, आणि म्हणून च आम्ही त्यांचें ओझरतें दर्शन घेण्याचा येथें यत्न करणार आहोंत. शके १५६७ सालीं शहापुर येथें श्रीसमर्थांनीं त्यांना अनुग्रह दिला. श्रीसमर्थ मसूरांत असतांना शहापूरच्या सईबाई त्यांच्या दर्शनास येत असत. सईबाईच्या चुलतभावाचा मुलगा भिकाजी हा समर्थदर्शनास येत असे. श्रीसमर्थांच्या आज्ञेवरून भिकाजीनें विहिरींत उडी टाकण्याचें धाडस केलें व नंतर त्यास श्रीसमर्थानुग्रह झाला. तो च पुढें तंजावरमठाधिपति झाला. शके १५७७ च्या श्रावणांत श्रीसमर्थांनीं मिरजमठाची स्थापना करून त्यावर वेणाबाईंची योजना महंत म्हणून केली, त्यानंतर कार्तिक महिन्यांत श्रीसमर्थ तंजावरास गेले व तेथें शहाजी राजांशीं त्यांनीं विचारविनिमय केला. नंतर व्यंकोजी राजे यांस अनुग्रह देऊन त्यांच्याच आग्रहावरून कांहीं दिवस तेथें राहून त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें तेथील मठावर भीमस्वामी यांना महंत म्हणून नेमलें. असो. रघुनाथपंडित, आनंदतनय, मेरुस्वामीनंदन, माधव इत्यादि कवि, मुत्सद्दी व धारकरी या भीमस्वामींच्या रामदासी संप्रदायांतील च होत.

## ( ५ ) महंत भीमस्वामींच्या आणखी सांनिध्यांत

महंत भीमस्वामींच्या सांनिध्यांत आणखी थोडेसें घोटाळावेंसें वाटतें. महंत भीमस्वामी गृहस्थाश्रमी होते. तरी हि त्यांना आपल्या सद्गुरूचा वियोग असह्य झाला आणि त्यांनीं आपली दर्शनोत्कंठा एक पत्र पाठवून श्रीसमर्थांना निवेदन केली. या पत्राला उत्तर म्हणून श्रीसमर्थांनीं जें पत्र पाठविलें आहे तें गुरुशिष्यांचा किती प्रेमळ संबंध असे, हें उत्तम प्रकारें दाखवितें. श्रीसमर्थ म्हणतात :

चित्रकळा नाना नाटक । म्हणोनि नामें कर्नाटक ।
तेथें जे रामउपासक । पत्र त्यांसी ॥ १
तुम्ही पत्र पाठविलें । याचूनि आश्चर्य वाटलें ।
परम समाधान जालें । देव जाणे ॥ २
प्रवृत्तीसी पाहिजे राजकारण । निवृत्तीसी पाहिजे विवरण ।
जेथें अखंड श्रवणमनन । धन्य तो काळ ॥ ३

तुम्हांसी प्रपंच आहे कांहीं । आम्हांसी तुम्हांवेगळें नाहीं ।
पत्र दर्शन सर्व हीं । स्मरणें होतें ॥ १६

ीमस्वामीकृत समर्थचरित्र धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें वर सांगितल्याप्रमाणें
ाके १८३२ साली प्रसिद्ध केलें आहे. त्यांच्या च " श्रीसमर्थांच्या अंतःकालाचें
.र्णन " करणाऱ्या पन्नास ओव्या रामदास रामदासी भाग १५ लेखांक २५ यांत
प्रसिद्ध झाल्या आहेत. महंत भीमस्वामींच्या सूचनेवरून व श्रीसमर्थांच्या आज्ञेप्रमाणें
व्यंकोजी राजे यांनीं श्रीराम, लक्ष्मण, सीतामाई व मारुति यांच्या पंचधातूंच्या मूर्ति
एका कारागिराकडून तयार करविल्या व त्या सज्जनगडावर पाठविण्यांत आल्या.
शके १६०० मध्यें आपल्या महंतांच्या व मठांच्या कार्याचें निरीक्षण करण्यासाठीं
व व्यंकोजी राजांच्या आग्रहावरून श्री समर्थ पुन्हां तंजावर प्रांतीं गेल्याचें दिसतें.

## ( ६ ) श्रीसमर्थमित्र शहाजी राजांच्या समाधीचा जीर्णोद्धार

श्रीसमर्थांचे परम मित्र शहाजी राजे यांच्या म्हैसूर संस्थानांतील समाधीच्या
जीर्णोद्धाराविषयीं दोन तरी शब्द लिहिल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं.
शिवाजी महाराजांचे वडील राजे शहाजी यांची समाधि म्हैसूर संस्थानांतील
शिमोगा जिल्ह्यात चेन्नगिरी तालुक्यांत होदिगेरीजवळ आहे. सन १९४० सालीं
चेन्नगिरी येथील कांहीं मराठा बांधवांनीं तिचा जीर्णोद्धार करण्याचा प्रयत्न केला,
परंतु तो अपुरा राहिला. शहाजी राजे आपल्या वयाच्या साठाव्या वर्षी घोड्यावर
बसून रमतेल्ल संतापणाऱ्या वन्य हिंस्र पशूंच्या शिकारीस गेले असतांना त्यांच्या
घोड्याचा एक पाय खड्यांत रुतला, आणि घोडा व घोडेस्वार दोघे हि खालीं
पडले. शहाजी राजे बेशुद्ध झाले व त्यांत च त्यांचा अंत झाला. सन १७११ पर्यंत
त्यांच्या समाधीची पूजाअर्चा होत असे व पेशवे सरकारकडून यरगाटनहळ्ळी हा
गांव या कामासाठीं इनाम म्हणून देण्यांत आला होता, असें कळतें. शहाजी
राजांची मृत्युतिथि शनिवार माघ शुद्ध ६ शके १५८६ अशी जेधे-शकावली
वरून समजते. तारखेप्रमाणें ही तिथि म्हणजे ता. २३ जानेवारी सन १६६४ होय.
दक्षिण हिंदुस्थानांतील भरीच तीन लाख मराठ्यांचें एकीकरण करण्याच्या दृष्टीनें हि
या समाधीचा जीर्णोद्धार करणें व दरवर्षी या पुण्यतिथीच्या प्रसंगीं सार्वत्रिक यात्रा
भरविणें योग्य होईल. श्रीरामदासांकित दक्षिण हिंदुस्थानांत शहाजी राजे व
श्रीसमर्थ यांचें स्मरण यामुळें अनायासें होण्यासारखें आहे.

| लेखनस्थळ | प्रसिद्धीस्थळ |
|---|---|
| पुणें, १८६४ ज्येष्ठ शु. ११ | १८६४ श्रावण शु. ४ |
| दिनांक २९ मे १९४२ | दिनांक १६ ऑगस्ट १९४२ |

---

## ( ७ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# नागकविकृत सीतास्वयंवर

### पंगुदेशमुखांच्या प्रती

### ( लेखक — गणेश शंकर देव, धुळें )

हें काव्य ग्रन्थाचे कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं " महाराष्ट्रकवींत शके १८२५ सालीं प्रथम प्रसिद्ध केलें. शक १८२६ मध्यें त्याची सुधारलेल दुसरी आवृत्ति त्यांनीं काढिली. मुंबई विश्वविद्यालयानें हें काव्य परीक्षेसा केव्हां नेमलें ठाऊक नाहीं, पण कोल्हापुरच्या राजाराम कॉलेजांतील मराठीचे प्रोफेसर द. दत्तात्रेय सीताराम पंगु, एम्. ए. यांनीं कै. भाव्यांच्या शक १८२५ च्या प्रतीवरून छापून आपलें "नागेशकविकृत सीतास्वयंवर" सन १९३१ सालीं प्रसिद्ध केलें. नागपुर विश्वविद्यालयानें हें काव्य आपल्या परीक्षेसाठीं केव्हां नेमलें तें हि ठाऊक नाहीं, पण " प्रो. पंगूंची आवृत्ति ही अनेक अशुद्ध पाठांनीं डागळलेली आहे " असें चार वर्षांनीं आढळून आल्यामुळें, " आणि मुंबई व नागपूर या विद्यापीठांनीं आपल्या परीक्षेसाठीं हें काव्य नेमलें असल्यामुळें त्याच्या शुद्ध आवृत्तीची निकड उत्पन्न झाल्या कारणानें " नागपूरचे डॉ. माधव गोपाळ देशमुख, एम्. ए., पीएच्. डी. यांनीं " नागेशकृत सीतास्वयंवर " या काव्याची आपली " पाठसंशोधित प्रत " सन १९४१ सालीं प्रसिद्ध केली.

श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १५०९ मध्यें " नागकविकृत सीतास्वयंवर " या काव्याचे ६१ श्लोक उतरून तें काव्य अपुरें सोडलेलें आहे. त्या ६१ श्लोकांबरोबर प्रो. पंगु व डॉ. देशमुख यांच्या प्रती मी ताडून पाहिल्या, आणि मला अनेक पाठभेद आढळले. त्यांपैकीं बहुतेक सगळे खालीं देत आहे.

( १ )

पंगुदेशमुखप्रत – प्रभाव वर्णी मति भारतीचे । १-३

मंदिरप्रत – प्रभाव वर्णी मग भारतीचे । १-१

( २ )

पंगुदेशमुखप्रत – होईल तेथें गुरुलाभ जावें । ६-१

मंदिरप्रत – होईल जेथें गुरुलाभ जावें । ६-१

( ३ )

पंगुदेशमुखप्रत – तत्संगमें राघवठाव पावे । ६-२

मंदिरप्रत – सत्संगमीं राघवठाव पावे । ६-२

( ४ )

पंगुदेशमुखप्रत – याकारणें या विपयीं रमावें ॥ ६

मंदिरप्रत – याकारणें या विपया वपावें ॥ ६

( ५ )

पंगुदेशमुखप्रत – मी वंदितों आजि कवींस मानें ।
ज्यांची कवित्वें अमृतासमानें ॥ ७

मंदिरप्रत – मी वंदितों आदिकवीस मान्य ।
ज्याची कवित्वें अमृतासमान्य ॥ ७

" अमृतास मान्य " असे शब्द तोडले तर जास्त बरें होईल की ! श्रीरामचरित्रांतील सीतास्वयंवराचा प्रसंग, त्यावर स्वतंत्र काव्य रचतांना कवि इतर कवींना मानानें वंदन करील, की रामायण गाणाऱ्या " मान्य " अशा " आदिकवीस " वंदन करील ?

( ६ )

पंगुप्रत – तत्संगतीं गीत रघूत्तमाची ।
बेडी तुटे हे जड धूर्तमाची ॥ ८

देशमुखप्रत – तत्संगतीं राघवगीत याची ।
बेडी तुटे हे जड दुष्टयाची ॥ ८

मंदिरप्रत – सत्संगतीं गीत रघूत्तमाची ।
बेडी तुटे हे जड हो तमाची ॥ ८

( ७ )

पंगुदेशमुखप्रत – त्याच्या गुणें अर्जित मी धनासी । ९-२
मंदिरप्रत – तिच्या गुणें अर्जित मी धनासी । ९-२

( ८ )

पंगुप्रत – संकटिले पोटदरीं समावे ।
ममापराधा उदरीं समावे ॥ १०

देशमुखप्रत – संकटिले पोटदरीस, मावे, ।
ममापराधा उदरीं समावे ॥ १०

मंदिरप्रत – संकटिले पोटदरीस माये ।
ममापराधा उदरीं समाये ॥ १०

( ९ )

पंगुदेशमुखप्रत – जिव्हे तुवां दृश्य रसा त्यजावें । ११-१
मंदिरप्रत – जिव्हे तुवां दुष्ट रसा त्यजावें । ११-१

( १० )

पंगुदेशमुखप्रत – अपार संसार तरी तराया ।
त्वरें यमाचे गति सीतराया ॥ ११

मंदिरप्रत – अपार संसार तसी तरावी ।
त्वरें यमाची गति सितरावी ॥ ११

( ११ )

पंगुप्रत – प्रार्थितों बहुत मी रसनेला ।
व्यर्थ वर्णनिं तुझा रस नेला ॥
सांडि सर्व विषयां, निज पावें ।
राम राम अयसें चि जपावें ॥ १२

देशमुखप्रत – प्रार्थितों बहुत मी रसनेला ।
व्यर्थ वर्णनिं तुझ्या रस नेला ।

सांडि सर्व विषयां, निज पावे ।
' राम राम ' अयसें चि जपावें ॥ १२

मंदिरप्रत – प्रार्थितों बहुतसा रसनेला ।
स्वर्य वर्णूं तुझा रस नेला ।
सांडि सर्व विषया निज भावें ।
राम नाम असें चि जपावें ॥ १२

( १२ )

पंगुप्रत – दुःखासि धावें मन हेंच रामा । १३-२
देशमुखप्रत – दुःखास्पद द्रव्य मना हरामा । १३-२
मंदिरप्रत – दुःखास कां द्रव्य मना हरामा । १३-२

( १३ )

पंगुप्रत – नको मना ! हांव धरूं धनाची ।
हे कारणें साधन बंधनाची ॥ १४
देशमुखप्रत – नको मना, हांव धरूं धनाची ।
जी होतसे साधन बंधनाची ॥ १४
मंदिरप्रत – नको महा हांव धरूं मनाची ।
हे कारणें बंधन साधनाची ॥ १४

( १४ )

पंगुदेशमुखप्रत – इणें तुझा तो रहिवास नेला । १५-२
मंदिरप्रत – इणें तुझा हा रहिवास नेला । १५-२

( १५ )

पंगुदेशमुखप्रत – पिसें तुला काय, अगा, धनाचें ।
त्यां देखिल्या काय अगाध नाचे ।
श्रीरामनामें जरि ये करासी । १६-२
मंदिरप्रत – पिसें मना काय अगा धनाचें ।

त्या देखिल्या मग्न अगाध नाचे ।
श्रीरामनामें जरि ये करासी । १६-३

( १६ )

पंगुप्रत – धांवशील क्षणि ये निज लाहे । १७-२
देशमुखप्रत – धांवशील, क्षणि ये निजलाहे । १७-२
मंदिरप्रत – धांवसी क्षणि यमा निज लाहे । १७-२

( १७ )

पंगुदेशमुखप्रत – दृष्टांत आत्मा रमणीय माळा । १८-१
मंदिरप्रत – दृष्टीस आत्मा रमणीय माळा । १८-१

( १८ )

पंगुदेशमुखप्रत – नेणे क्रिया बंधन आसनाचे ।
संकीर्तनीं दास उदास नाचे ॥ १८

मंदिरप्रत – नेणे क्रिया साधन बंधनाचें ।
सत्कीर्तनीं दास उदास नाचे ॥ १८

( १९ )

पंगुप्रत – राम राम अइसेंचि जपावें । २०-२
मोक्षलक्षणिं सुधारस पावें ॥ २०-४
देशमुखप्रत – ' राम राम ' अइसेंचि जपावें । २०-२
मोक्षलक्षणसुधेस टिपावें ॥ २०-४
मंदिरप्रत – राम नाम असेंचि जपावें । २०-२
मोक्षलक्षणसुधेसि टपावें ॥ २०-४

( २० )

पंगुदेशमुखप्रत – श्रीरामनामें मग पारखावें । २१-२
मंदिरप्रत – श्रीरामनामें मग पारखावें । २१-२

(२१)

पंगुदेशमुखप्रत – राम राम रुचि तो धरिताहे ।
तो ससार जप मी करिताहे ॥ २२

मंदिरप्रत – रामनामरुचि तो धरिताहे ।
तो चि सार जप मी करिताहे ॥ २२

(२२)

पंगुप्रत – ओतली पुतळिका कनकाची । २४-२
काय होइल गति गणकांची ॥ २४-४

देशमुखप्रत – ओतली पुताळि का कनकाची । २४-२
काय होइल गती गणकाची ॥ २४-४

मंदिरप्रत – योतिली पुतळी ते कनकाची । २४-२
काय होइल गती जनकाची ॥ २४-४

(२३)

पंगुदेशमुखप्रत – ते उक्ति माझ्या वदनें वदावी । २५-२

मंदिरप्रत – ते युक्ति माझे वदनीं वदावी । २५-२

(२४)

पंगुदेशमुखप्रत – ते ते परी म्यां तरि आचरावें ॥ २६

मंदिरप्रत – ते ते परी म्यां रीती आचरावें ॥ २६

(२५)

पंगुदेशमुखप्रत – भूतळींत कृति एक विराजे ।
जीस मानिति महा कविराजे ॥ २८

मंदिरप्रत – भूतळांत कृति येक विराजे ।
त्यासि मानिति महा कविराजे ॥ २८

पण या दोन ओळी

भूतळांत कृतिये कविराजे ।
त्यासि मानिति महाकवि_राजे ॥

असा लिहितां येतील हो ? आणि असा ?

भूतल्यांत कृतिये कवि राजे ।
त्यासि मानिति महा कवि राजे ॥

कपीच्या मनांत काय होतें कोणास ठाऊक ! आपण मात्र ही काय ओढाताण चालविली आहे !

( २६ )

पंगुप्रत – श्रीरामचित्तीं निजभाव दावी । २९-२
वर्णीन मी तूजहि पूर्णनेंसी ॥ २९-४

देशमुखप्रत – श्रीराम चित्तीं निजभाव दावी । २९-२
वर्णीन मी तूं जन्हि पूर्ण नेसीं ॥ २९-४

मंदिरप्रत – श्रीराम चित्तीं मज भाव दावी । २९-२
वर्णीन मी तो तरि पूर्ण नेसीं ॥ २९-४

( २७ )

पंगुप्रत – वर्णावया जानकिच्या विवाहा ।
लंबोदरा ! दे मति जेवि वाहा ॥
रामें मनामाजिं वरें वसावें ।
वाग्देवते ! त्वां वदनीं वसावें ॥ ३०

देशमुखप्रत – वर्णावया जानकिच्या विवाहा ।
लंबोदरा, दे मति, जेंवि वाहा ।
रामें मनामाजिं वरें वसावें ।
वाग्देवते, त्वां वदनीं वसावें ॥ ३०

मंदिरप्रत – वर्णावया जानकिच्या विवाहा ।
लंबोदरा हे गति जे विवाहा ।
वाग्देवते त्वां वदनीं असावें ।
रामें मनामाजिं वरें वसावें ॥ ३०

" जेवि वाहा " हे शब्द " जे विवाहा " असे लिहिण्यांत चूक तर होत नसेल ना ?

( २८ )

पंगुदेशमुखप्रत – अक्षिष्ठ जो मान्य जनास मान्य । ३३-२

मंदिरप्रत – अक्षिष्ठ जो मान्य सदा समान । ३३-२

( २९ )

पंगुदेशमुखप्रत – जो खळास बहु धाक विराजे । ३४-३

मंदिरप्रत – जो सदा बहुत धाक विराजे । ३४-३

( ३० )

पंगुदेशमुखप्रत – सौंदर्य फार मग सज्जन लाहे ।
तोप तो मुनिजनां जनलाहे ॥ ३५

मंदिरप्रत – सौंदर्य फार वरि सज्जन लाहे ।
तोप तो मुनिजना निजलाहे ॥ ३५

( ३१ )

पंगुप्रत – तद्‌गृहीं अवनिजा नवरीतें ।
कोणता वर निधान वरी तें ॥ ३७

देशमुखप्रत – तद्‌गृहीं अवनिजा नवरी ते ।
कोणता वर निधान वरीते ॥

मंदिरप्रत – ज्या गृहीं असतिजा नवरी ते ।
कोण वर्णिल निधान नवरी ते ॥ ३७

असतिजा म्हणजे अयोनिजा.

( ३२ )

पंगुप्रत – मही भार हा राक्षसें फार झाला ।
तदुच्छेदनीं राम जन्मास आला ॥ ३९

देशमुखप्रत – मही राक्षसें भार हा फार झाला ।
तदुच्छेदनीं राम जन्मास आला । ४०-२

मंदिरप्रत – मही राक्षसी भार हा फार जाला ।
तया छेदनीं राम जन्मासि आला । ४०-१

( ३३ )

पंगुप्रत – जया नाममात्रें जळे पंकराशी । ४०-१
देशमुखप्रत – जया नाममात्रें जळे पंकराशी । ४०-१
मंदिरप्रत – जया नाममात्रें जळे पापराशी । ४०-१

( ३४ )

पंगुदेशमुखप्रत – होतसे वह्वरणीं नवनाय ॥
मंदिरप्रत – होतसे वह्वरणीं वनवास ॥ ४१

हस्तदोष असेल कदाचित्. पण म्हणून हा पाठ खेड्यांना कळावयास नको का ! शिवाय रामकथेत अरण्याचें महत्त्व फार आहे. यांतून कोणाला कांहीं अर्थ सुचणार च नाहीं कशावरून ?

( ३५ )

पंगुदेशमुखप्रत – जे शक्ति आद्या अविनाशि माया ।
थोडी मही रूप जिचें समाया ।

मंदिरप्रत – जे शक्ति अद्यापि विनाश माया ।
थोडें मही रूप तिचें समाया । ४२-२

( ३६ )

पंगुदेशमुखप्रत – विदेहगेहाप्रति जाय पाहें ॥
मंदिरप्रत – विदेहगृहाप्रति जात आहे ॥ ४३

( ३७ )

पंगुदेशमुखप्रत – जेणें रणीं क्षत्रियरेणु केला ।
मंदिरप्रत – तेणें जगीं क्षत्रियरेणु केला । ४४-२

( ३८ )

पंगुप्रत – हातींच कोदंडधरालपाचें । ४४-३

देशमुखप्रत – द्वारींच कोदंड कराल ज्याचें । ४५-१
मंदिरप्रत – द्वारींच कोदंड धरी जयाचें । ४५-१

( ३९ )

पंगुप्रत – आला गृहा भार्गव जो सहाजा । ४५-२
देशमुखप्रत – आला गृहा भार्गव जोहरा जा ॥ ४५-४
मंदिरप्रत – आला असे भार्गव जोहरा जा ॥ ४५-४

( ४० )

पंगुदेशमुखप्रत – सहस्रबाहो वधुनी अशानें ।
मंदिरप्रत – सहस्रबाहूसि वधोनिशानें । ४६-३

( ४१ )

पंगुदेशमुखप्रत – म्हणे तुम्हां आगम कोण काजा ।
मंदिरप्रत – स्वामी तुम्हां आगम कोण काजा । ४८-२

( ४२ )

पंगुप्रत – सीता सखीसंगतिं खेळ खेळा । ४९-२
देशमुखप्रत – सीता सखीसंगतिं खेळ खेळे । ४९-४
मंदिरप्रत – सीता सखी संमत खेळ खेळे । ४९-४

( ४३ )

पंगुप्रत – देखोनि तें दुर्घट कर्म बोले ।
सविस्मयें भार्गव बोल बाले ॥ ४९
अखर्व तो ही मम गर्व गेला । ५०-१
देशमुखप्रत – देखोनि तें दुर्घट कर्म बोळे ।
सविस्मयें भार्गव बोल बोले ।
अखर्व तो ही मम गर्व गेला । ५०-१
मंदिरप्रत – देखोनि तें दुर्घट कर्म बोले ।
सविस्मयो भार्गव बर्म बोळे ।
अखर्व तो सर्व ही गर्व गेला । ५०-१

( ४४ )

याप्रमाणें ५० श्लोक झाल्यावर प्रो. पंगु व डॉ. देशमुख या उभयतांच्या हि प्रतींत नसलेला खालील ५१ वा श्लोक मंदिरांतील प्रतींत आहे.

जनकनृपति तुझ्या मंदिरीं इंदिरा हे ।
ललित दुहितचेपें सृष्टिची आदि राहे ।
स्वयंवर करि ईचें देइजे ईस देवा ।
शुण करुनि इयेच्या पावसी तूं सदेवा ॥ ५१

मंदिरांतील प्रतींत हा ५१ वा श्लोक असल्यामुळें पुढील श्लोकांचे क्रमांक एकएकानें वाढले आहेत.

( ४५ )

पंगुप्रत – सइंवर इचें तें काळ नाहीं गमाया ।
सकळ सुरवरां हे म्हर्सिची योगमाया । ५१-२

देशमुखप्रत – सइंवर रचि ईं तें काळ नाहीं गमाया ।
सकळ सुरवरां हे म्हर्सिची योगमाया । ५१-२

मंदिरप्रत – स्वयंवर करि ईचें काळ नाहीं गमाया ।
सकळ सुरविरा हे म्हर्सिची योगमाया । ५२-२

( ४६ )

पंगुदेशमुखप्रत – स्वयें वरी हे नवरी तयाला । ५२-३
मंदिरप्रत – स्वयंवरीं हे नवरी तयाला । ५३-३

हा च म्हणजे पंगुदेशमुखांच्या प्रतींतील ५२ वा श्लोक या काव्यांत पुन्हा एकदां १०३ श्लोकानंतर आला आहे. उभयतांनीं हि तो त्या ठिकाणीं म्हणजे १०३ श्लोकानंतर व १०४ श्लोकापूर्वी क्रमांकरहित दिला आहे. मात्र दोघांनीं हि **स्वयंवरीं हे नवरी तयाला** असा च त्या श्लोकाचा तिसरा चरण तेथें दिला आहे.

( ४७ )

पंगुप्रत – जनक मूळ करी क्षितिराजया ।
क्षितितळीं अति कुलिन राजया ॥ ५५

प्रो. पंगु यांनीं " क्षितितळीं " या शब्दावर टीप दिली आहे ती अशी : " या श्लोकांतील चवथ्या ओळींत पहिला शब्द 'महाराष्ट्रकवीं' त छापलेल्या प्रतींत दिला नसून, त्या ऐवजीं ⏑ ⏑ ⏑ – असें त्या शब्दाचें स्वरूप दर्शविलें आहे. नागेशाची यमकासक्ति व तिसऱ्या ओळीचा च त्याला अनुवाद करावयाचा आहे, हें लक्षांत घेऊन मी येथें 'क्षितितळीं' असा शब्द योजला आहे. "

देशमुखप्रतींत या श्लोकाचा चौथा चरण

……… अतिकूलिन राजया ॥ ५५

असा आहे. चरणांतील पहिल्या शब्दासाठीं डॉ. देशमुख यांनीं टीप दिली आहे, ती अशी : " 'सकलही' असा शब्द असावा. प्रो. पंगु 'क्षितितळीं' असें देतात. "

पण श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील प्रतींत या श्लोकाचा चौथा चरण आहे तो असा :

अति कुलीन वळी निज राजया ॥ ५६

आपआपली आवृत्ति प्रसिद्ध करण्यापूर्वी प्रो. पंगु व डॉ. देशमुख यांचें लक्ष श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १५०९ मधील " नागकविकृत सीतास्वयंवर " या प्रकरणाकडे गेलें असतें, म्हणजे त्यांना 'क्षितितळीं' आणि यांना 'सकलही' हे शब्द सुचविण्याची आवश्यकता च वाटती ना!

( ४८ )

पंगुप्रत – कर्नाट, लाट, सिरसाट, अचाट मोठे।
संक्राड, द्राविड, गऊड, अमोड साटे ॥ ५८

देशमुखप्रत – कर्नाट, लाट, सिरसाट, अचाट मोठे।
संस्काड, द्राविड, गऊड, अमोड काठे ॥

मंदिरप्रत – कर्णाट, लाट, सिरसाट, अचाट काये।
सस्काकडे द्रविड गौड अमोघ लाटे ॥ ५९

( ४९ )

पंगुदेशमुखप्रत – विदेह द्रौंदी, गजपत्रिकेसी। ५९-१

मंदिरप्रत – विदेह द्वेदे मग पत्रिकेसी। ६०-१

## ( ५० )

याप्रमाणें प्रो. पंगु आणि डॉ. देशमुख यांच्या प्रतीतील ५९, म्हणजे मंदिरांतील प्रतीतील ६०, श्लोक झाले. प्रो. पंगु यांनीं ५९ व्या श्लोकाला टीप देऊन मध्यचंपमहद्दर्शे कै. नारायण चिंतामण केळकर यांचेकडून कै. भाग्यांना मिळालेल्या प्रतींत ५९ व्या श्लोकानंतर असलेले, आणि कै. राजवाडे यांचेकडून कै. भाग्यांना मिळालेल्या प्रतींत नसलेले, चार श्लोक प्रो. पंगु यांनी उद्धृत केले आहेत. त्यांपैकीं पहिला श्लोक प्रो. पंगु देतात तो असा :

स्वस्ति श्रीमत्सकळगुणगणा पूर्णकीर्णस्वभावा,
देवाध्या देवदेवा, अपरिमित निधी, सर्वविद्याप्रभावा, ।
शास्रें, शस्त्रें विचित्रें तुजजचाळि कळा, मंत्रयंत्रादि तंत्रें,
नाना पात्रें पवित्रें निवसितिहि सदा अग्निहोत्रें स्वतंत्रें ॥

हा च श्लोक मंदिरांतील प्रतींत ६१ वा, म्हणजे पंगुदेशमुखांच्या प्रतींतील ५९ व्या श्लोकानंतर आहे तो असा :

स्वस्ति श्रीमत्सकळगुणगणा कीर्णपूर्णस्वभावा ।
देवाध्या देवदेवा अपरविधि निधी सर्वविद्याप्रभावा ।
शास्रें शस्त्रें विचित्रें तुजजचळि कळा मंत्रयंत्रादि तंत्रें ।
नाना पात्रें विचित्रें चिवसति सदा अग्निहोत्रें स्वतंत्रें ॥

या प्रमाणें बाडांक १५०९ मध्यें या सीतास्वयंवराचे ६१ श्लोक देऊन तें प्रकरण अपुरें च ठेवण्यांत आलें आहे. ज्या पानाच्या आरंभीं हा श्लोक संपला आहे तें पान तसें च कोरें सोडून पुढील पानावर मनकर्णिकेच्या स्नानाचा संकल्प दिला आहे. नकलकारानें हें " स्वयंवर " अपुरें कां सोडलें सांगतां येत नाहीं ।

### मंदिरांतील प्रतीचें महत्त्व

हे सारे पाठभेद आज प्रथम पुढें येत आहेत. कै. भाग्यांच्या प्रतींत ते नाहींत, प्रो. पंगूंच्या प्रतींत ते नाहींत आणि डॉ. देशमुखांच्या पाठसंशोधित (!) प्रतींत हि ते नाहींत. आज ते नव्यानें च माहीत होत आहेत. ते सारे किंवा त्यांपैकीं कोणते सरस म्हणून ग्राह्य व कोणते निरस म्हणून त्याज्य हा प्रपंच आज मी करीत नाहीं. पण या पाठभेदांपैकीं अनेक पाठभेद निःसंशय असे आहेत कीं, जे आपल्याला माहीत असते तर आपण त्यांचा स्वीकार जरूर केला असता असें प्रो. पंगु व डॉ. देशमुख हि म्हणतील.

कदाचित् हे सारे च पाठभेद कोणाला त्याज्य वाटतील हि. पण तरी देखील भावे, पंगु, देशमुख या कोणाच्या च प्रतींत नसलेल्या मंदिराच्या प्रतींतील ५१ व्या श्लोकाचें महत्त्व कसें कमी होईल ? रा. भाव्यांबद्दल कोहीं च म्हणता येत नाहीं, पण श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या स्थापनेनंतर या काव्याच्या आपआपल्या आवृत्या प्रसिद्ध करणाऱ्या रा. पंगुदेशमुखांचें लक्ष मंदिरांतील या प्रतीकडे गेलें असतें, तर आपआपल्या प्रतींत पदरचे शब्द घालून पुरा केलेला ५५ व्या श्लोकाचा चौथा चरण वाचा न लागतां मंदिरांतील प्रतीचा अधिकृत चरण त्यांना देता आला असता. असो.

## प्रार्थना

प्रो. पंगु आणि डॉ. देशमुख यांचें श्रीसमर्थवाग्देवतामंदिराकडे दुर्लक्ष झाल्याबद्दल मला कांहीं म्हणावयाचें नाहीं. मात्र या उभयता विद्वानांनीं संपादिलेल्या " नागेशकविकृत सीतास्वयंवर " काव्याच्या प्रती अपूर्ण आणि अशुद्ध आहेत, असें म्हणावयास आतां हरकत नाहीं असें वाटतें. " यापुढें कोणा हि संतकवीच्या काव्याची संपूर्ण आणि शुद्ध प्रत काढावयाची झाल्यास या संग्रहाकडे वळल्यावांचून तसें करणें जवळ जवळ अशक्य होईल " असा जो " श्रीसमर्थवाग्देवतामंदिर – धुळें " या संस्थेच्या पत्रीनें दावा सांगण्यांत येत असतो, तो कसा यथार्थ आणि खरा आहे हें वर उल्लेखिलेल्या पाठभेदांवरून पुन्हां एकवार सिद्ध होत आहे, तिकडे मात्र मराठीच्या अभ्यासकांचें, अध्यापकांचें, प्राध्यापकांचें आणि विद्वानांचें लक्ष जावें, आणि सर्वांनीं मराठीचें वैभव वाढविण्यासाठीं श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रहाचा भरपूर उपयोग करून घेत जावा, अशी प्रार्थना आहे.

| लेखनकाळ | प्रसिद्धिकाळ |
|---|---|
| १८६४ ज्येष्ठ वद्य ८ | १८६४ श्रावण शुद्ध ४ |
| ६ जून १९४२ | १६ ऑगस्ट १९४२ |



( ८ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# खरा व सरस पाठ कोणता ?

( लेखक – रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापुर )

श्रीमत् दासबोधांतील भिक्षेच्या समासांत ( १४-२ ) श्रीसमर्थांनीं

भिक्षाहारी निराहारी । भिक्षा नैव प्रतिग्रहः ।
असंतो वापि संतो वा । सोमपानं दिने दिने ॥ १ ॥

असा श्लोक उध्दृत केला आहे. श्री एकनाथ महाराजांची गाथा वाचीत असतांना "हिंदु – तुर्क – संवाद" नांवाच्या रूपकांत ( साखरेकृत एकनाथ गाथा ३९६६ ) हा च श्लोक पाठभेदानें आढळला; तो असा —

भिक्षाहारी निराहारो भिक्षा नैव प्रतिग्रहः ।
असंतुष्टः सदापापी संतोषी सोमपः स्मृतः ॥

या श्लोकांतील दुसरा चरण वरील श्लोकांतील दुसऱ्या चरणाहून पुष्कळ च भिन्न आहे. तेव्हां याचा विचार व्हावा.

| लेखनकाळ | प्रसिद्धिकाळ |
|---|---|
| दिनांक ७ जून १९४२ | दिनांक १६ ऑगस्ट १९४२ |

## (९)

# जनकजापतिचा लघुसा कवि ?

## श्री समर्थ रामदास

( लेखक – रा. नारायण गजानन जोशी, अेम्. अे., अहमदाबाद )

भारतांतील भक्तिमार्गानें ज्या कांहीं उत्तम गोष्टी घडवून आणल्या आहेत, त्यांतील महत्त्वाची एक गोष्ट म्हणजे त्यानें लोकांत खरें साहित्य प्रसृत केलें. इतर प्रांतांप्रमाणें च महाराष्ट्रांत जे मोठमोठे संत होऊन गेले, त्यांनीं कळवळ्यानें लिहिलेल्या अभंग पदें यासारख्या वाङ्मयाचा गोडावा कांहीं अपूर्व आहे. न्या. माधवराव रानड्यांपासून ह. भ. प. पांगारकरांपर्यंत अनेक बुद्धिवादी आणि श्रद्धावादी पंडितांचें हृदय तें आळवणी गातांना भरून येतें, तसें च माझ्यासारख्या साध्या पण भक्तिप्रवण नसलेल्या माणसापासून तों माझ्या एका चांभार शिक्षक-बंधूसारख्या, अेकतारीवर चोखामेळ्याचीं किंवा तुकारामाचीं अभंग-पदें म्हणत तल्लीन होणाऱ्या, भक्तापर्यंत सर्व साधारण लोकांचीं मनें या " ब्रह्मानंदीं टाळी " लागून गायिलेल्या गीतांमुळें भारलीं जातात. हें संतवाङ्मय म्हणजे महाराष्ट्राचें बहुमोल भावगीतात्मक साहित्यधन आहे – जितकें साधें, तितकें च जिव्हाळ्याचें, आणि म्हणून च अतिशय मूल्यवान् असें.

ज्ञानेश्वर महाराजांपासून तुकारामांपर्यंत झालेल्या अनेक संतांचें आणि संतिणींचें लिखाण उत्तम भाववाङ्मय म्हणून मान्यता पावलें च आहे. पण यांत समर्थ रामदासांच्या स्फुट काव्यांना फारसें स्थान मिळालें नाहीं. समर्थांचें वाङ्मय तत्त्वविचाराच्या दृष्टीनें किती श्रेष्ठ आहे हें लोकमान्यांनीं " गीतारहस्यांत " त्यांच्यावर किती भर दिला आहे त्यावरून कळून येतें च. योगी अरविंद बाबूंसारखे महापुरुष त्यांच्या " महाराष्ट्रधर्माच्या " परम भव्य कल्पनेवर अतिशय लुब्ध होऊन गेले. पण हें जरी खरें असलें तरी " साहित्य " या दृष्टीनें त्यांचें लिखाण फारसें वाचलें जात नाहीं, हें नक्की. केवळ सांप्रदायिक आणि अन्य कारणांनीं जरी त्यांच्या " दासबोधाचीं " आणि " मनोबोधाचीं " पारायणें होतात, तरी त्यांतील आकर्षण भावात्मक नसून विचाररूप असतें. तर मग काय रामदासांत भक्तीचा

उमाळा कमी होता ? की भक्तिमार्गापेक्षां ज्ञानमार्ग अधिक श्रेयस्कर वाटल्यामुळें त्यांनीं हें " बोधात्मक " लेखन केलें ?

यांपैकीं पहिलें कारण तर उघड उघड असंभाव्य असें आहे; आणि दुसऱ्या-संबंधी असें म्हणतां येईल कीं, समर्थांना भक्तिमार्गापेक्षां ज्ञानमार्ग श्रेष्ठ आहे असें जरी वाटत असलें तरी त्यांनीं स्वतः च एका पदांत सांगितल्याप्रमाणें " सगुण " आणि " साकार " परम तत्त्वाचें निरूपण करणें हें च श्रेयस्कर असें ते मानीत होते. दुसऱ्या एका पदांत ते म्हणतात :

भडस भजनें पुरावी । ज्ञानें वृत्ती मुरावी ॥ ५ ॥
देहेबुधी तों भजन करावें । दास म्हणे विवरावें ॥ ३ ॥
(पदपदांतरें-पृष्ठ १४८)

पुढील प्रसिद्ध ओवींत तर त्यांचें मत स्पष्टपणें मांडलेलें आहे :

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ११-५-४

आणि म्हणून च ते अगदीं टाहो फोडून लोकांना सांगत आहेत :

उपासकांसि सूचना । उपासना उपासना ॥

फरक इतका च कीं, इतर संतांनीं जरी लोकजागृति केली तरी ती बहुधा निवृत्ति-वादाच्या अनुषंगानें च. नित्य नैमित्तिक कर्मे सोडा आणि पांडुरंगाचें भजन करा, मात्र तें करतांना कुठल्या हि अडचणींना जुमानूं नका, हा इतर संतांचा उपदेश; तर श्रीरामाचें भजन तर करा च, पण त्यासवें स्वतःची अनुबंधचतुष्टयामुळें संभवणारीं कर्तव्यकर्मे हि करा, हरिकथानिरूपण अव्याहत चालण्यासाठीं राजकारण अवश्य आहे म्हणून तें हि चालवा, असा समर्थांचा संदेश. त्यामुळें महाराष्ट्रांत विलक्षण जागृति झाली; शिवरायांचें कार्य सुकर झालें; **दासबोध** सर्वमान्य ग्रंथ झाला; आणि त्या मानानें त्यांची खरी तितक्या च कळवळ्यानें लिहिलेलीं " गोड, प्रेमळ आणि रसाळ " अशीं इतर किरकोळ स्फुट काव्यें " कमी " वाचलीं जाऊं लागलीं. आणखी दुसरें कारण असें असावें. रामदासांनीं केवळ बोधपर आणि विचारमूलक अशी पद्यमय रचना प्रमाणांत फार च अधिक केल्यामुळें इतर संतांइतकी च प्रेमळ असूनही त्यांची आत्मगत ( subjective ) कविता त्यांची " विशिष्ट " रचना म्हणून संमत झाली नाहीं. अर्थात् रामदासांचीं किरकोळ काव्यें अजून हि जनतेच्या तोंडीं आहेत च. हनुमान आणि शंकर यांच्या रसाळ " आरत्या "; भीमरूपी स्तोत्र; " धांव रे रामराया, किती अंत पहासी " हा कळवळ्याचा धांवा; " श्रीगुरुचे

चरणकंज हृदयीं स्मरावे " हें मधुर पद; " छत्रपुराणनी अयोध्येचा राजा " हें सांप्रदायिक भजन; " घटका गेली पळें गेलीं " इ. प्रसिद्ध पद; अशासारखीं कित्येक स्फुट काव्यें लोक मोठ्या भक्तीनें अजून हि गातात च. फरक हा कीं, अितरांचीं असलीं रसाळ पद्यें च प्रातिनिधिक मानलीं जातात; रामदासांच्या बाबतींत मात्र " दासबोध " आणि " मनोबोध " हीं च काव्यें वैशिष्ट्य दाखविणारीं समजलीं जातात.

साहित्यशास्त्राच्या दृष्टीनें विचार करतां त्यांची ही अितर रचना च वेधक, जिव्हाळ्याची, आणि भावप्रधान म्हणून अधिक कलात्मक वाटते. आधीं च रामदासांचें अंतरंग रामस्वरूपीं लीन झालेलें, ते म्हणतात :

रामीं रंगलें मन माझें रे माझें रे । नावडे आणिक कांहीं दुजे रे ॥ध्रु०॥

अशा रंगून गेलेल्या वृत्तींत लिहिलेलीं काव्यें अतिशय रसाळ आणि उत्कट आहेत; आणि तीं च काव्यें कलात्मक म्हटलीं पाहिजेत. या दृष्टीनें त्यांचीं " करुणाष्टकें " फार च वरच्या प्रतीचीं काव्यें गणलीं पाहिजेत. सर्व च नाहीं तरी बरेचसे पंचीकरणादि अभंग, कांहीं पदपदांतरें, रामायणाच्या युद्धकांडांतील कांहीं भाग, मनोबोधांतील जिव्हाळ्याचे कित्येक श्लोकसमूह, उत्तम भावकाव्यमय रचनेचे नमुने च आहेत. यांत श्रीरामाच्या " प्रीतीनें सौख्य " अतिशय हृदयंगम आणि उत्कट स्वरूपांत व्यक्त झालें आहे.

या भावकाव्यांतील मुख्य स्थायी भाव देवताविषयक " रति " हा च असणार. देव-भक्तांच्या रतीचें " भक्ति " रसांत रूपांतर होतें. या भक्तीला च पोषक होणारी, " रति " या च स्थायी भावाचीं, शालीन विनय, वात्सल्य, देशप्रेम, इत्यादि दृश्य उपरसरूपें हि रामदासांच्या या काव्यांतून दिसून येतात. त्या च प्रमाणें वीररसानें रसरसलेली, पण लगेच शांत रसांत विरघळून जाणारीं, अशीं हि काव्यें रामदासांनीं लिहिलेलीं आहेत. कांहीं केवळ वर्णनपर अशी गोड रचनेचीं काव्यें हि आपणास दाखवितां येतील; पण त्यांतील हि मुख्य रस भक्ति च आहे. शालीन आणि विनयशील भक्तीचे नमुने याहून उत्तम मिळूं शकतील काय ? वडिलांच्या ठिकाणीं असणाऱ्या " श्रेष्ठांना " आणि प्रत्यक्ष " मातुःश्रीस " लिहिलेल्या ओवीमय पत्रांतील हे पहा रामदासांचे उद्गार :

तूं पवित्रपणें वैश्वानरू । तूं समर्थपणें ईश्वरू ।
तूं प्रतापाचा दिनकरू । धगधगायमान ॥
तूं सकळ तीर्थांचें यश । तूं उंच आकाश ।
तूं मायेचा मूळ पुरुष । सकळकर्ता ॥

( पंढरीहून श्रेष्ठांस पत्र )

तूं भावार्थाची जननी । तूं विरक्त संजीवनी ।
तूं परमार्थाची खाणी । भजनशीळ ॥
तूं सर्व सुखांची मूस । तूं आनंद रत्नांची मांदूस ।
तुझेनि चुकती सायास । संसारीचे ॥

( पंढरीहून मातुःश्रीस पत्र )

वरील वडीलभक्तीप्रमाणें च गुरुभक्ति हि खालील पद्यांतून दिसत नाहीं कां ?

श्रीगुरुचे चरणकंज हृदयीं स्मरावे ॥

किंवा

गुरुदातारें दातारें । अभिनव कैसें केलें ॥

वडील मंडळीबद्दल जितका आदर, तितका च प्रेमळपणा लहानांना उद्देशून लिहिलेल्या काव्यांतून दिसत आहे. शिवाजीसंभाजीना लिहिलेलीं पत्रें प्रसिद्ध च आहेत.

आतां कांहीं दुसरे वेंचे पाहूं या. पुढील रसाळ काव्यामध्यें राम वनवासाला निघाला आहे आणि माता कौसल्या पृथ्वीला विनवीत आहे.

पृथ्वी तुला राघव नीरवीला । याच्या श्रमीं रुतसी पाउलाला ।
ज्यामात तूझा प्रतिपाळि याते । फळें तन्हीं सौम्य हरीं क्षुधेतें ॥

करुणा. ६१-२

वाजों नको कर्कश रे समीरा । असेल जेथें नृपरत्न हीरा ।
तो स्वामि रे हा तुझिया सुताचा । सधूळिं होइल देह त्याचा ॥ ५

माता कौसल्या भूमातेचें अंतःकरण जाणून होती, कारण ती हि स्त्री च होती. माझ्या मुलाचा प्रतिपाळ तूं कर, असें ती सांगत नाहीं; तुझ्या जांवयाचा प्रतिपाळ तूं कर अशी गोड घरगुती सूचना ती तिला देत आहे.

आणि मग वायूला उद्देशून हि ती घरची च खूणगांठ पटवून देते. हे वायो, तुझ्या मुलाचा — हनुमंताचा — हा स्वामी आहे; तेव्हां तूं जोरांत वाहूं नकोस, याचा देह धुळीमुळें मलीन होईल. यांत बारकाईनें पहातां कालविपर्यासाचा दोष जरी दिसून आला — वनवासांत गेल्यानंतर पुढें मारुतिराय भेटले, आधीं नव्हे, या दृष्टीनें — तरी यांतील जी *मार्मिक* छटा आहे, ती अतिशय हृदयंगम आहे.

या नंतरच्या एका श्लोकांत प्रेमळपणाची पराकाष्ठा झाली आहे.

सपक्षिकूळ्यसह कोकिळ्या हो । सीते सुशब्दीं तुम्ही रंजवा हो ।
हे धाकुटी योगिणी कुंजवासी । तुम्ही च तेथें सखिया तयेसी ॥ ७

हें खरें माउलीचें हृदय. सीता सानुली आहे, पण जोगीण बनून वनवासाला चालली आहे, तिच्या मैत्रिणी तिला दुरावणार, तेव्हां, कोकिळांनो, आपल्या मैत्रिणी जमवून तुम्ही तिच्यासवें खेळा बरें." हा जिवंत जिव्हाळा कन्या "आवडीच्या कळवळ्यामुळें" निर्माण झाला आहे. आतां आपण च विचार करून सांगा कीं, हा कवि मोरोपंतांइतका च मार्मिक आहे कीं नाहीं ? पृथ्वी, आप, तेज, वायु वगैरेंची कौसल्येनें केलेली ही प्रार्थना वाचून, होते कीं नाहीं कुमारी कुंतीनें गंगेला केलेल्या प्रार्थनेची आठवण ?

> गंगे गोदे यमुने माझा नेदें तुझा चि हा बाळ।
> जतन करी गे माते स्वाधिन केला न कांपिता नाळ॥
>
> (मोरोपंत)

हा च प्रेमळ वात्सल्यभावना पुढील श्लोकांत हि आढळून येते.

> पहा हो पहा राम आरण्यवासी। पुरी त्यागिली सर्व येका जिवेसीं।
> मऊ सुमनें सेज खुपे जयाला। असा राम तो सौम्र पाईं निघाला॥
>
> करुणा. ७०-१

तसें च उद्धवमाधव या शिष्य जोडीला उद्देशून ते म्हणतात :

> अरे उधवा माधवा काय केलें। हरीवीण कां वेर्थ आयुष्य गेलें।
> कळेना तुला ज्ञान तुझें जळालें। तुझें प्रीतिचें सौख्य कोठें बुडालें॥
>
> करुणा. १३४-१

कारण हें "प्रीतीचें सौख्य" त्यांच्या जीवनाचा आधार आहे; आणि म्हणून च काव्याचा प्राण आहे.

देशभक्ति आणि जनप्रीति दाखविणाऱ्या ओजस्वी छटा सर्व संतमंडळींत केवळ समर्थांच्या च काव्यांतून आढळणें शक्य आहे. "मराठा तितुका मिळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा।" इत्यादि ओव्या, शिवाजीस लिहिलेलें पत्र, संभाजीस लिहिलेल्या पत्रांतील "आहे तितुकें जतन करावें। पुढें आणिक मिळवावें। महाराष्ट्रराज्य करावें। जिकडे तिकडे॥" इत्यादि भाग, क्षात्रधर्मावरील ओव्यांपैकीं "देव मस्तकीं धरावा। अवघा हलकल्लोळ करावा।" इत्यादि ओव्या, आणि "आनंदवनभुवन" ही दीर्घ कविता यांतील तेजस्विता खरोखर च अजोड आहे.

> बुडाले सर्व ही पापी। हिंदुस्थान बळावलें।
> अभक्तांचा क्षयो जाला। आनंदवनभुवनीं॥ स्फु. प्र. ५८-२८

बुडाला औरंग्या पापी । म्लेंचसंव्हार जाहाला ।
मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंदवनभुवनीं ॥ ३३

आणि खालील सतान्यांतील जनहिताची तळमळ किती स्पष्ट आहे !

जन बुडाले बुडाले पोटेंविण गेले । बहु कष्टले कष्टले किती एक मेले ।
विसा लोकांत लोकांत एक चि राहिले । तेणें उदंड उदंड दुःखचि साहिलें ॥
(गाथा ११२२)

वरील उद्गार लोकांच्या भौतिक दुःस्थितीमुळें कळवळून निघाले आहेत, तर पुढील पद त्यांच्या आध्यात्मिक दुबळेपणाला उद्देशून लिहिलें गेलें आहे.

कल्याण करीं देवराया । जनहेत विवरीं ॥ ध्रु० ॥
तळमळ तळमळ होत चि आहे । हे जन हातीं धरीं ॥ १
अपराधी जन चुकत गेले । तुझा तूं चि सांवरीं ॥ २
(गाथा १२५८)

आणि असल्या च तळमळींतून पुढील आर्त करुणामय शब्द उमटले गेले :

बहुत चि सुकुमारा स्वस्थ नाहीं शरीरा ।
निशिदिनीं जनचिंता लागलीसे उदारा ।
सकळ जन सुखावे तो कसा काळ पावे ।
भजन जन उठावे थोर आनंद पावे ॥

शेवटीं समर्थांच्या (किंवा सर्व च संतांच्या) भावकाव्याची प्राणभूत जी ईश्वरभक्ति तिकडे वळावयाचें. काव्यरचनेच्या वेळीं मनाच्या वृत्तींचे जितके जितके भिन्न पैलू असतील तितक्या चित्रविचित्र या भक्तिरसाच्या छटा असणार. बहुधा प्रसन्नपणें च भक्त आपल्या पूज्य देवतेला स्तवीत असतात. तेव्हांची (१) प्रसादपूर्ण रसाळता ही भक्तिरसपर काव्याच्या विलक्षण ओढीची गुरुकिल्ली आहे. त्या वेळीं च भक्त परमेश्वरपदीं पूर्ण लीन होऊन आत्मसमर्पण करतो. ही (२) अर्पणवृत्ति भक्तीचा एक मोहक विशेष आहे. मात्र क्वचित् याच्या मुळाशीं विरक्ती हि असते. त्यामुळें केव्हां केव्हां (३) वैराग्यपर त्यागभावना विशेष दिसून येते. तरी हि शेवटीं ऐहिकता चिकटून रहावे च, देवभक्ताच्या अंतिम ऐक्याची जाणीव होऊन हि "साक्षात्कार" होत नाहीं, मुक्ति मिळत नाहीं; म्हणून मग समर्थांसारखे परम भक्त देवाची आर्त आळवणी करितात. ह्या (४) करुणामय आर्ततेमुळें च त्यांच्या "करुणाष्टकादि" काव्यांतून हृदयाला भिडणारा उत्कटपणा दिसतो आहे. ह्या सर्व च

छटा मनोहर आहेत, वेधक आहेत, आणि त्यामुळें च ह्या कविता श्रेष्ठ पण अहेतुकपणें निर्मिलेल्या कलाकृति आहेत.

इंद्रधनुष्याचे रंग जसे दुरून एकमेकांत मिसळलेले दिसतात, तशा या छटा एकमेकांत मिसळून कांहीं अनुपम गोडावा कित्येक अभंगांतून झाला आहे :

दीनांचा दयाळू कीर्ति ऐकियेली । म्हणोनी पाहिली वाट तुझी ॥ १
अनाथाचा नाथ होशील कैवारी । म्हणोनियां हरी बोभाईलें ॥ २
तुजविण कोण जाणे हें अंतर । कोणासी जोजार घालूं माझा ॥ ३
( गाथा – ३३९ )

माझें अंतर जाणणारा जसा दुसरा कोणी नाहीं, तशी च माझ्या उद्धाराची चिंता, रामा, कोण बरें तुझ्यावांचून वाहणार ?

तुजविण देवा मज कोणी नाहीं । माझी चिंता कांहीं असों द्यावी ॥१
( गाथा – ३४३ )

अगदीं हा च कळवळा त्यांनीं रघुनाथभट पंडितराय ह्यांना लिहिलेल्या गद्य पत्रांत फार च उत्कटपणें व्यक्त झाला आहे.

मज रघुनाथजी वेगळें कोण्ही जिवलग नाही + + + हें इतुके म्या आवडीच्या कळवळ्याने लिहिले आहे

हा आवडीचा कळवळा च त्यांच्या आर्त आणि उत्कट आळवणीचा प्राण आहे. इतर संतांनीं विठ्ठलाला " विठाई " आणि ज्ञानदेवांना " ज्ञानदेव माउली " म्हणून आळविलें; समर्थ हि आपल्या " रामाबाई " ला कळवळून बोलावीत आहेत. येईं हो रामाबाई; आणि ती " राममाय " अजून हि येत नाहींसें पाहून ते विचारतात :

कां हो राममाये दुरी धरियेलें । कठिण कैसें केलें चित्त तुझें ॥ १
देउनी आलिंगन प्रीतिपडीभरें । कैं मुख पीतांबरें पुसशील ॥ २
घेउनी कडिये धरूनी हनुवटी । कैं गुजगोष्टी सांगशील ॥ ३
रामदास म्हणे केव्हां संबोखिसी । प्रेमपान्हा देसी जननीये ॥ ४
( गाथा – अभंग ३५१ )

जगज्जननीच्या ठिकाणची समर्थांची ही भक्ति म्हणजे बालकाची आपल्या जन्मदात्या आईवरची प्रीति ! येथें शुद्ध, सरळ, प्रेमळपणा आहे. विरक्ति, मायावाद आदि गोष्टी येथें निरुपयोगी; येथें फक्त अन्योन्य प्रेम. राममाईनें आपल्या तोंडावरून हात फिरवावा, पोटाशीं धरावें, हनुवटी धरून कानगोष्टी कराव्या असा दासांची

किती किती इच्छा आहे! ही च " रामराय " बाळकृष्णाचें रूप घेऊन गोडपणें मुरली वाजवितें :

> सुरस मधुर वेणु । वाजवितो रुणझुणु ।
> विकळ होताहे प्राणु । भेटीकारणें ॥ १
> अखंड लागलें ध्यान । स्वरूपीं गुंतलें मन ।
> सकळ पाहतां जन । आठवे हरी ॥ २
>
> ( गाथा–अभंग ११२७ )

पण नंतर मात्र पंढरीला येऊन तो च पांडुरंग झाला. तेव्हां रामदास विचारतात :

> येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ १
> काय केली सीतामाई । येथें राही रखुमाई ॥ *

अशा रीतीनें गुजगोष्टी करणारी ही देवभक्तांची जोडी आहे. आणि त्यांचा प्रेमाचा उमाळा अखंड टिकतो, कारण तो परस्परपूरक आहे, एकांगी नाहीं.

> भक्तांचा देव भोळा । भक्तांचे मनिंचें करी ।
> हारद जीविंचें जाणे । राजा त्रैलोक्यनाथ की ॥

अशी एकमेकांची मनें एक झाली असल्यामुळें च श्रीसमर्थ ही संपूर्ण अर्पणवृत्ति दाखवूं शकतात.

> तनु मनु धनु या रघुनायेका । निरवणें धरणें सुखदायका ।
> भवभयासि वळे भडकाविसी । परम सुंदर तें पद पावसी ॥
>
> ( करुणा ६५–२ )

अशा अनेक स्थळीं ही प्रसन्नता आणि अर्पणवृत्ति आढळून येतात.

आतां शेवटीं " भीमरूपी स्तोत्रें " आणि " करुणाष्टक " स्तोत्रें यांकडे वळावयाचें. " भीमरूपी महारुद्रा " हें स्तोत्र तर आपल्या तोंडीं आहे च. तितकी च तेजस्विता तिसऱ्या स्तोत्रांत हि चमकते आहे.

> कोपला रुद्र जे काळीं । तें काळीं पाहवे चि ना ।
> बोलणें चालणें कैंचें । ब्रह्मकल्पांत मांडला ॥

आणि चौथ्या स्तोत्रांत वीररसाबरोबर च प्रेमळपणा कसा आहे पहा.

---

* गाथ्यांत तर हा चरण असा आहे : काय झाली सीता सती । येथें बहुत जन दिसती ॥ ( सं. स. स. )

झळक झळक दामिनी । वितंड काळकामिनी ।
तया परी झळा झळी । लुळीत रोमजावळी ॥...
रूपें रसाळ बाळकू । समस्त चित्त चाळकू ।
अतूळ तूळणा नसे । अतूळ शक्ति धीठसे ॥

सहावें स्तोत्र तर रसाळपणाचा मूर्तिमंत पाझर च आहे. त्यांत जशी कौतुकमिश्र मधुरता आहे, तशी च मनःपूर्वक आळवणी आहे.

फणिवर उठवीला वेग अद्भूत केला । त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा घोष गेला ।
रघुपति उपकारें दाटले थोर भारें । परम विर उदारें रक्षिलें सौख्यकारें ॥ ९

मारुतिरायांच्या या उपकारानें रामरायाचें हृदय दाटून आलें. त्या भक्तप्रिय रामाला समर्थ म्हणतात कीं,

तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे । म्हणउनि मन माझें रे तुझी वास पाहे ।

मी लहान, तूं वडील; तेव्हां देवा,

वडिलपण करावें सेवकां सांवरावें । अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ।
निपट चि हटवादे प्रार्थिला शब्दभेदें । कपि घन करुणेचा बोलला रामवेधें ॥१०

ओजस्, प्रसाद आणि विनय यांचा "भीमरूपी" स्तोत्रांतील मनोवेधक आविष्कार "करुणाष्टकादि" स्तोत्रांतील आर्त आळवणीहून जरा सुद्धां कमी प्रतीचा नाहीं. तरी हि रामदासांच्या मनाची तळमळ (दुसऱ्या काव्यांतून दिसली तरी) "करुणाष्टकादि" काव्यांत सर्वोत्कट स्वरूपांत आपणांस दिसून येते. रामाच्या दर्शनासाठीं भक्ताचें मन सारखें झुरत आहे. "सदा सर्वदा योग तुझा घडावा" हें च आतां रघुनायकापाशीं त्यांचें मागणें आहे. दीनांच्या दयाळु रामा, तुझें मोद राखावयास तूं माझा उद्धार कर.

. मोदाकारणें दीन हातीं धरावें । म्हणे दास भक्तांसि रे उधरावें ।
सुटे मोद आम्हांसि सांडूनि जातां । रघुनायेका मागणें हें चि आतां ॥
(करुणा. ६७-९)

कारण,

संसारसंगें बहु पीडलों रे । कारुण्यसिंधु मज सोडवीं रे ।
कृपाकटाक्षें सांभाळि दीना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥
(करुणा. ५७-८)

म्हणून राममाये, तूं ये आणि या बाळाला जवळ कर; तुझ्यावांचून जिणें कंठणें अशक्य झालें आहे. संसाराच्या उन्हाळ्यांत मी भाजून पोळून निघत आहे. हे भक्तवत्सल भगवंता,

दुःखानळें मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांति नाहीं ।
आधार तुझा मज मी विदेसी । सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी ॥
( करुणा. ११०-१ ).

केव्हां दाखविणार तुझें तें साजिरें गोजिरें सांवळें रूप ! देहाची लाही लाही होते आहे आणि जीव कळवळून आक्रंद करीत आहे. आतां केवळ तूं च माझा आसरा आहेस !

आणि मग समर्थ आपलें हृदय उघडून दाखवितात. रामा, माझ्या हातून जें कांहीं अयोग्य कर्म घडलें असेल, ज्या कांहीं चुका मी केल्या असतील, त्यासाठीं, मेघश्यामा, मला अनुदिन अनुताप होत आहे. मन ओढाळ आहे, त्यांवरतां आवरत नाहीं. परमेश्वरा, बहुत दीन होतो आहे रे; आतां धांवा, सत्वर प्रगट व्हा !

जळत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी । मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ।
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु । षड्रिपुकुळ माझें तोडि याचा विरोधु ॥
करुणा. १४५-६

रामा, तूं " सबळ " आहेस, म्हणून माझ्या अंतरंगीं तुझी " मोठी आस " लागली आहे, तुझ्या दर्शनाचे दिवस मी बोटांवर मोजीत आहे; मला " अवचट " भेटी दे; मी मिठी घालीन रे तुला, माझ्या आत्मारामा !

लेंकराला मायबापांवांचून किंवा चातक पक्ष्याला शीतल चंद्रावांचून जसें जग खामल वाटतें, तशी च माझी स्थिति तुझ्यावांचून झाली आहे : दुसरे सगेसोयरे व्यर्थ होत.

स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे । रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ।
माझा कैवारी, कैपक्षी अेक च – दीनानाथ श्रीराम.

उपरति मज रामीं जाहली पूर्ण कामीं । सकळ भ्रम विरामीं राम विश्राम धामीं ।
घडिघडि मन आतां रामरूपीं भरावें । रघुकुळटिळका रे आपुलेसें करावें ॥

समर्थ रामदासांच्या भक्तिरसानें ओथंबलेल्या काव्याचें स्वरूप असें उत्कट आणि चेतोहर आहे. व त्यांतील जिवंतपणा कित्येक आधुनिक कवींच्या मरगळलेपणापेक्षां अनंत पटीनें प्रक्षोभक आहे. म्हणून च हीं काव्यें खरीं भावकाव्यें आहेत आणि साहित्यकलेचे बावनकशी नमुने आहेत. रचना ओबडधोबड असली, तरी भावना नितांत रम्य असल्यामुळें त्या रचना सरस्ल म्हणून च स्वीकारल्या जाणार. हें जाणून आपण विचार केला, तर समर्थांनीं गणपतीस्तव प्रार्थना करतांना म्हटलें तें आपणांस खरें वाटेल ना ! हां " जनकल्पतिचा लघुसा कवि " " शब्दसृष्टीचा ईश्वर " च आहे ना ?

लेखनकाळ
दिनांक १० जून १९४२

प्रसिद्धिकाळ
दिनांक १६ सप्टेंबर १९४२

( १० )

# श्री समर्थ रामदास आणि रामदासी महाराष्ट्र धर्ममंडळ स्वराज्य जयजयकार

( लेखक—पंडित ज्योतिःकाव्यालंकारभूषण विष्णु बाळकृष्ण जोशी, कन्नडकर, कन्नड )

( १ )

अक्षरबंधात्मक आर्याकाव्य

ही श्री भारतभूमी स्वर्णखनी पूज्य भारतीयांची ।
जी सर्वकाल सकळा संपन्न विशाल वैभवें साची ॥ १
सामर्थ्य मातृभूचें पूर्वीपासूनि जगीं असामान्य ।
सार्थकता जन्माची प्रत्येकीं गुण वसे असा मान्य ॥ २
श्री रामकृष्ण नलनृप पांडव शक राष्ट्रकूट यादव जे ।
धाम यशाचें, भूषण 'धर्माचे प्राण' जाहले राजे ॥ ३
त्या दानशूर साध्वी देवी सीमंतिनी सती शान्या ।
ज्या सर्व-दा सुमंगल उपकारक कीर्ति ठेउनी गेल्या ॥ ४
ही आसमुद्र सीमा दीर्घ हिमालय महाद्रिपर्यंत ।
खाणि स्वराष्ट्रभूची जेथ 'महाराष्ट्रधर्म' साचंत ॥ ५
कीं राहिला सुखानें चातुर्वर्ण्यप्रधान जन येथें ।
समता सनातन महा वैदिक धर्मांतरीं सदा वसते ॥ ६
गोदा भागिरथी — शिव — यमुना — कृष्णा महानदी शुद्ध ।
ज्या सीत — नीर — पूरित पावन — गुण वाहताति अनिरुद्ध ॥ ७
सोम प्रवाळ कांचन अमृत महौषधि फलाब्ज वल्लींनीं ।
जे हार रत्न मौक्तिक संसिद्ध जन्मभू — सु — फल — दानीं ॥ ८

श्री राष्ट्र — राजकारण — धर्म — स्वातंत्र्य — देश — उद्धार ।
राष्ट्र श्रेय शिवाजी रायगडेश्वर पद्म महोदार ॥ ९
जो धर्म, सत्त्व, रक्षित धन्य पराक्रम अखंड राष्ट्राचा ।
फर्म स्वदेश हिंदवि जागृतिचा ध्वज फरांत घे साचा ॥ १०
सामंत सार्वदेशिक शूर महाजन अभेद चेतविले ।
मंडळ पराक्रमाचें करुनी देशीं स्वराज्य वाढविलें ॥ ११
कळली जाणीव जयां त्यांनीं अवतार — कार्य साधुनियां ।
कीं स्वतपःसामर्थ्ये जनतार्थी रामदास होउनियां ॥ १२
श्री रामदास गुरुनीं नैष्ठिक दैविक महा अनुष्ठान ।
राज्य स्वार्थ त्यागुनि केलें राष्ट्रार्थ लोककल्याण ॥ १३
राज प्रजाजनमनें आकर्षुनि देव — देश — भक्तींत ।
"जय राम" शब्द योगें सामर्थ्या दे समर्थ शक्तींत ॥ १४
गाजविले शूरांचे वर्ण्य पराक्रम हरूनि परधर्म ।
काय यशा वानावें दिव्य समर्थ — प्रबोध गुणवर्म ॥ १५
हें कार्य समर्थांचे पुढती चालो सदैव लोकांत ।
सार — प्रभाव जनता तारिल कीं "दासबोध" शोकांत ॥ १६

( २ )

अक्षरबंधात्मक गद्यकाव्य

ॐ श्री "यज्ञेन यज्ञमयजंतदेवाः" "समानीव आकूतिः" व
तीं "सहस्रशीर्षापुरुषा आणि "पूर्णमदः पूर्णमिदं" इत्यादि
समता व राष्ट्रैक्यबोधक श्रुतिप्रमाणें आचरणांत आणून
सार्थकतापूर्वक नृपजनपद — लोकसंग्रह करीत अपूर्व
विराट सामर्थ्य सचैतन्य जनताजनार्दनाला समर्पीत
रामकृष्णभक्तीसह स्वार्थत्यागरूप यज्ञ योगी संत
सदाचरणसंपन्न भक्त प्रल्हाद नारद ध्रुव पुंडरीक गोरक्ष
रसज्ञ मुकुंदराज ज्ञानेश्वर नाथ श्रीनृसिंह सरस्वती

जे आदि दत्तमूर्ति संत जनार्दन गौरांग सूर तुळसी नरसी
आणि एकनाथ रामदास समर्थ आदि संत कवी भारतभूंत झाले.
स्वराष्ट्र–स्वराज्य–स्वधर्म–हितवर्धक अशा परंपरेमध्यें
समर्थ रामदास स्वामी विशिष्ट प्रकारें अभिनव चैतन्य
चिदानंद ओतप्रोत राजकारणी राष्ट्रगुरु शोभायमान झाले.
रसीक व पुण्यप्रद ग्रंथ दासबोध द्वारें — " परधर्मबंधहरण "
रामनाम महात्म्य, "-जय जय रघुवीर समर्थ, " " हर-हर महादेव, "
महाराष्ट्रधर्म संवर्धन, " सामर्थ्य आहे चळवळीचें "
मराठा तितुका मेळवावा, " ब्राह्मणाची मुख्य दीक्षा, "
राष्ट्रकार्य चाळविजे ऐसें, " यन्हि तो चेतवावा रे, "
स्वधर्मे निधनं श्रेयः, " परी तेथें अधिष्ठान पाहिजे, "
धर्म स्वराज्य कर्मयोग, " अखंड महाराष्ट्र स्वातंत्र्य सूर्य "
सुमंत्र विवेक, इत्यादि महासिद्धांत विचारप्रवर्तक
मंडळ प्रभाव ज्ञानप्रकाश स्वाभिमान सामर्थ्यभूषणवंत युक्त
तळमळ व तत्परता जागृत ठेवून ज्यांचा अवतार
ज्या स्वराज्य हिंदवी धर्माकरितां च झाला त्या क्षत्रियकुळ
विराजमान राजे शिवाजी महाराजांकडून — नीति, प्रेम, कर्तव्य
राज्यसंवर्धन सद्विचार इत्यादि योगांनीं भरतखंडांत
विजय कृष्ण काळानंतर मात्र — भूवर स्वातंत्र्य तेज किरणें
नय कीर्ति औदार्य धर्म सत्य सत्यांसह प्रकाशित झाली.
" राजकारण ", " धर्मकारण ", "राष्ट्रकारण", " परसत्तानिवारण "
" भयदैन्यहरण ", इत्यादि राष्ट्रीय कार्ये श्रीसमर्थराष्ट्रगुरु पुण्य-
प्रकाश रामदास स्वामी व श्री राजे शिवाजी हे आचंद्रार्क
चिरंजीव सत्कर्मरूपानें अनुकरणीय व अमर आहेत.

लेखनकाळ
ता. १ जून १९४२

प्रसिद्धिकाळ
ता. १६ सप्टेंबर १९४२

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्री समर्थ व श्री तुकोबाराय

यांच्या

# अभंगांतील विलक्षण साम्य

( लेखक – रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापुर )

श्री समर्थ व श्री तुकोबाराय यांच्या दोन अभंगांत विलक्षण साम्य दिसून आलें. वाचकांना तें विचारार्ह वाटेल असें समजून, ते अभंग खालीं देत आहे.

| श्री समर्थांचा अभंग | श्री तुकारामांचा अभंग |
| --- | --- |
| संसार करीतां म्हणती हा दोषी ।<br>न करीतां आळसी पोटपोसा ॥ १ | संसार करितां म्हणती हा दोषी ।<br>टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ |
| ऐसा हा लोकीक कदा राखवेना ।<br>पतितपावना देवराया ॥ २ | ऐसा हा लौकिक कदा राखवेना ।<br>पतितपावना देवराया ॥ १ |
| भक्ती करूं जातां म्हणती हा पसारा ।<br>न करीतां नरा निंदीताती ॥ ३ | आचार करितां म्हणती हा पसारा ।<br>न करितां नरा निंदिताती ॥ ३ |
| आचारें असतां म्हणती नाक धरी ।<br>येर अनाचारी पापरूपी ॥ ४ | |
| सत्संग धरितां म्हणती हा उपदेसी ।<br>येर आभाग्यासी ज्ञान कैचें ॥ ५ | संतसंग करितां म्हणती हा उपदेशी ।<br>येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥ ४ |
| आभाग्यासी म्हणती ठाईंचा करंटा ।<br>समर्थासी ताठा लावीतसे ॥ ६ | धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा ।<br>समर्थासी ताठा करिताती ॥ ५ |
| बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ ।<br>न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ७ | बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ ।<br>न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ६ |

| | |
|---|---|
| भेटीस नवजातां म्हणती हा निष्ठुर ।<br>जातां म्हणती घर बुडवीलें ॥ ८ | भेटीसी नवजातां म्हणती हा निष्ठूर ।<br>येतां जातां घर बुडविलें ॥ ७ |
| धर्म न करितां म्हणती हा सांचीतो ।<br>करीतां काढीतो दिवाळें कीं ॥ ९ | |
| लग्न करूं जातां म्हणती हा मातला ।<br>न करीतां जाला नपुंसक ॥ १० | लग्न करूं जातां म्हणती हा मातला ।<br>न करितां जाला नपुंसक ॥ ८ |
| निपुत्रिक म्हणती पाहा हा चांडाळ ।<br>पातकाचें फळ पोरवडा ॥ ११ | निपुत्रिक म्हणती पहा हो चांडाळ ।<br>पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ |
| सुखें नाम घेतां करीती टवाळी ।<br>न घेतां टवाळी सर्व काळ ॥ १२ | |
| दिसा मरों नये रात्री मरों नये ।<br>करों तपें नये मागें पुढें ॥ १३ | |
| मर्यादा धरीतां हा आळशु चोरट ।<br>न धरीतां धीट म्हणती लोक ॥ १४ | |
| लोक जैसा लोक धरीतां धरेना ।<br>अभक्ती सरेना अंतरीची ॥ १५ | लोक जैसा ओक धरितां धरवेना ।<br>अभक्ता जिरेना संतसंग ॥ १० |
| दास म्हणे मज सुखाची आधार ।<br>दुस्तर संसार तरीजेल ॥ १६ | |
| | तुका म्हणे आतां आइका वचन ।<br>त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ |
| ( प. क. म. पं. स्फु. ओव्या ११ ) | ( गाथा – आर्यभूषण – अभंग ११६ ) |

श्रीसमर्थांचा अभंग १६ चरणांचा आहे, तर श्रीतुकारामांचा ११ चरणांचा आहे. श्रीसमर्थांच्या अभंगांतील ४, ५, १२, १३, १४ व १६ हे चरण श्रीतुकारामांच्या अभंगांत नाहींत, तसेंच श्रीतुकारामांच्या अभंगाचा शेवटचा चरण श्रीसमर्थांच्या अभंगांत नाहीं. राहिलेले १० चरण दोन हि अभंगांत जवळ जवळ अक्षरशः सारखे च आहेत. किरकोळ शब्दभेद आहेत, पण ते महत्त्वाचे नाहींत.

या च रीतीचे आणखी दोन अभंग उदाहरणार्थ आहेत.

### श्री समर्थांचा अभंग

कर्ता येक देव तेणें केलें सर्व ।
तयापाशीं गर्व कामा नये ॥ १

देहे हें देवाचें वित्त कुबेराचें ।
तेथें या जीवाचें काय आहे ॥ २

देता देवविता नेता नेवविता ।
कर्ता करविता जीव नव्हे ॥ ३

नीमीत्याचा धणी केला असे प्राणी ।
पाहातां निर्वाणीं जीव कैंचा ॥ ४

लक्ष्मी देवाची सर्व सत्ता त्याची ।
त्याविण जीवाची उरी नाहिं ॥ ५

दास म्हणे मना सावध असावें ।
दुश्चीत नसावें सर्व काळ ॥ ६

( स. क. प्र. सं. स्फु. ओव्या १२२)

### श्री तुकारामांचा अभंग

आलिया संसारा उठा वेग करा ।
शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १

देह हें काळाचें धन कुबेराचें ।
तेथें मनुष्याचें काय आहे ॥ २

देता देवविता नेता नेवविता ।

येथें त्याची सत्ता काय आहे ॥ ३

निमित्ताचा धनी केला असे प्राणी ।

तुका म्हणे म्हणोनि व्यर्थ गेला ॥ ४

( आ. भू. गाथा – अभंग ३०८६ )

या हि दोन अभंगांतील साम्य प्रथमतः दिलेल्या दोन अभंगांतील साम्याप्रमाणें च आहे. श्रीसमर्थ व श्रीतुकोबाराय समकालीन आहेत. तेव्हां परस्परांनीं परस्परांचें लिखाण वाचलें असणें संभवनीय आहे. परस्परांत विचारसादृश्य असणें अगदीं शक्य आहे. पण हें शब्दसादृश्य फार विलक्षण वाटतें ! म्हणून हे चार अभंग विचारासाठीं रामदासी मासिकाच्या वाचकांसमोर ठेविले आहेत.

लेखनकाळ
दिनांक ७ जून १९४२

प्रसिद्धिकाळ
दि. १६ सप्टेंबर १९४२

॥ श्री ॥

# आमच्या संशोधनाच्या श्रमाचा भोंपळा !

( लेखक—प्रिन्सिपाल दामोदर केशव ओक, बी. ए., नागपुर )

श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक १५०९ मध्यें मुक्तेश्वरकृत अहिरावण-महिरावणचरित्र व सुलोचनागहिवर हीं दोन ओवीबद्ध प्रकरणें आढळलीं. त्या प्रत्येकाचे दोन दोन प्रसंग ( अध्याय ) आहेत. त्याप्रमाणेंच बाडांक ६१ मध्यें अहिमहिरावणाख्यानाची दुसरी प्रत आहे. पहिलें बाड वऱ्हाडांतील कारंजे येथील रोकडाराम यांच्या मठांतून मिळालेलें असून तें सुमारें १५० वर्षांपूर्वीचें आहे. बाडांक ६१ हें कल्याणस्वामींच्या डोमगांव ( निजामचें राज्य ) येथील मठांतून मिळालेलें असून तें देखील सुमारें १४०।१५० वर्षांपूर्वीचें असावें.

मुक्तेश्वर हे शिवछत्रपतींच्या वेळचे एक नामांकित प्रतिभासंपन्न कवि होते. त्यांनीं संपूर्ण ओवीबद्ध महाभारत रचिलें आहे, असा लोकप्रवाद आहे. परंतु आतांपर्यंत त्याचीं फक्त पांचच पर्वें उपलब्ध झालीं आहेत. त्याच्याशिवाय त्यांची आणखी पुष्कळ फुटकळ कविताही आहे.

मुक्तेश्वर व रामदास हे समकालीन असून त्यांचा परस्परांशीं नात्याचा संबंधही होता. मुक्तेश्वराचे मातामह एकनाथ महाराज हे रामदासांचे मावसे असा हा नात्याचा संबंध असल्यामुळें मुक्तेश्वराची कविता डोमगांव व कारंजे येथील रामदासी संप्रदायांतील मठांत आपुलकीच्या भावनेनें संग्रहीत केलेली असणें शक्य आहे, असें आम्हांला वाटलें.

शिवकालीन समाजामध्यें वीरश्री उत्पन्न करण्याची फार आवश्यकता होती. म्हणून तत्कालीन संतांनीं व कवींनीं वीररसपरिपोषक विषयांना प्राधान्य देऊन त्या धोरणानें बरीच ग्रंथरचना केली आहे. समर्थांनीं रामायणांतील सुंदरकांड व

---

( १ ) श्रीसांप्रदायिक विविध विषय, खंड पहिला, लेखांक ११ व ४६ पहा.

( २ ) मुक्तेश्वरकृत विराटपर्व ( आम्हीं संपादिलेली आवृत्ति ) – उपोद्घात पहा. ( निर्णयसागर छापखाना, मुंबई )

युद्धकांड हीं दोनच कांडें रचिलीं आहेत. कृष्णदाससमुद्गल यांनीं फक्त युद्धकांडच रचिलें आहे. मुक्तेश्वरानें ( श्लोकबद्ध ) रामायण सबंध रचिलें आहे. तथापि त्यानें सर्वच रामायणावर ओवीबद्ध रचना केली नसली, तरी वीररसाचा प्रकर्ष उत्पन्न करणारें युद्धकांड रचिलें असावें, किंवा त्यानें त्यांतील कांहीं प्रसंगांवर तरी काव्य-रचना केली असावी, अशी उपरिनिर्दिष्ट दोन प्रकरणें पाहून आमची समजूत झाली.

सुलोचनागहिंवर व अहिरावणमहिरावणचरित्र हीं दोन आख्यानें — त्यांचा कर्ता कोणीहि असो — त्या काळीं लोकप्रिय होतीं, याचें गमक म्हणजे हीं निरनिराळ्या पुष्कळ बाडांत उतरून घेतलेलीं आढळतात. हीं लोकप्रिय होण्याचीं कारणेंही तशींच महत्वाचीं होतीं व तीं त्यांतील कथानकें ज्यांस माहीत आहेत अशा कोणाही मर्मज्ञाच्या सहज लक्षांत येण्यासारखीं आहेत.

आपल्या प्राचीन कवींनीं महाभारत, रामायण, पुराणें इत्यादि ग्रंथांतील कथानकांवर काव्यें रचिल्याबद्दल त्यांना दोष देणारे आधुनिक विद्वान पुष्कळ आढळतात. परंतु पौराणिक कथानकांवर भर देण्यांत त्यांचा जो हेतु होता तो आजकालच्या पंडितांच्या लक्षांत येत नाहीं. शिवकालीन धामधुमीच्या काळांत व धकाधकीच्या मामल्यांत नेहमीं लढाया व्हावयाच्या व पुष्कळ पराक्रमी पुरुष धारातीर्थीं पडावयाचे, त्यांची जागा वीरश्रीनें बाहु स्फुरण पावणाऱ्या ताज्या दमाच्या तरुणांनीं भरून काढण्यांत घडाडी दाखवावयाची व कित्येक साध्वींवर वैधव्याचा वज्राघात व्हावयाचा — अशा त्या राष्ट्रीय आपत्तीच्या काळीं पराक्रम व पुण्याई यांचा ओघ अखंड चालू राहण्याच्या कामीं अशा त्या काव्यांचा फार मोठा उपयोग झाला आहे.

सुलोचना ही वीरपत्नी व वीरस्नुषा यांचा एक उच्च आदर्श आहे. तिची पतिभक्ति, तिची तेजस्विता, तिचा करारीपणा इत्यादि गुण अनुकरणीय आहेत. " पातिव्रत्याचा प्रभाव कसा अदम्य असतो, " हें सुलोचनेचें पावित्र्य व चारित्र्य यांच्या द्वारें तत्कालीन स्त्रियांपुढें मांडावयाचें, हा कवीचा मुख्यतः हेतु असला पाहिजे.

अहिमहिरावणांच्या चरित्राच्या योगें तरुणांची वीरवृत्ति उचंबळावी, हा हेतु तर कवीचा असलाच पाहिजे. परंतु त्याखेरीज आणखी एक महत्वाचें तत्त्व त्यांत

---

१ " मराठी राज्यांत प्रत्येक किल्ल्यावर कृष्णदाससमुद्गलाच्या युद्धकांडाचीं पारायणें होत असत. या युद्धकांडाच्या पारायणानें अंगांत युद्धसामर्थ्य येऊन युद्धांत जय मिळतो, अशी तत्कालीन लोकांची भावना होती. रणांगणावर योद्ध्याच्या अंगीं युद्धचैतन्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य कृष्णदाससमुद्गलाच्या काव्यांत होतें. " ( आळतेकरकृत श्रीसमर्थचरित्र, पृष्ठ ४१६ ).

कृष्णदाससमुद्गल एकनाथाच्या वेळीं होऊन गेला.-समाधी शक १५९०

गोविलेलें आहे. तें लक्षांत येण्यास तें सर्व कथानक येथें उतरून घेणें अवश्य आहे. परंतु स्थळाच्या अभावीं तसें करणें शक्य नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते.

अहिमहिचरित्रांत सांगितलें आहे कीं, एकदां मारुति सात समुद्र ओलांडून जात असतां थाकरला व त्याचा समुद्रांत पडलेला सकाप ( थुंकी ) एका मगरीनें गिळिला. त्यामुळें तिला गर्भ राहून तिच्यापोटीं मकराक्ष नांवाचा पराक्रमी पुत्र जन्मास आला. मूळ गोष्टीला थोडी मुरड घालून कवीनें ती वर्णिली असावी आणि म्हणून तिच्यावर आपला भरंवसा न बसणें साहाजिक आहे. तथापि परराष्ट्रीय पुरुषाच्या ठिकाणीं आत्मीयता उत्पन्न झाल्यामुळें अहिमहिरावणाशीं लढून त्यांना कसें जिंकतां येईल, हा गुप्तभेद त्या मगरीकडून मारुतीस कळला व अशा प्रकारें त्या मगरीनें आपल्या [ मकर ? ] राष्ट्राशीं द्रोह केला व त्यामुळें अहिमहीरावणांचा नाश झाला. अशा देशद्रोह्या प्रकारावरून तत्कालीन समाजास सावधगिरीची सूचना देणें, हें कवीचें कर्तव्य होतें.

या कथानकाचें आणखी एका दृष्टीनें महत्त्व आहे. चंद्रसेनेनें अहिरावणाच्या मरणाची युक्ती मारुतीला कां सांगितली व तिच्या मनांत रामाविषयीं अभिलाषा उत्पन्न कां झाली, हें पराक्रमाच्या धुंदींत असलेल्या व उन्मत्त झालेल्या तरुणास कळणें अवश्य होतें. अहिरावणाच्या मरणाची युक्ति चंद्रसेनेनें मारुतीस सांगितली, याचें कारण ती एक नागकन्या होती व तिला त्या राक्षसानें पळवून आणून बंदींत ठेविलें होतें. तिच्यावर महीरावणही लुब्ध होता. तेव्हां त्या दोघांचा नाश व्हावा व आपली सुटका होऊन श्रीरामचंद्रासारखा सर्वगुणसंपन्न पति आपणास प्राप्त व्हावा, असें त्या अविवाहित व स्वतंत्र तरुणीस वाटलें, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. सारांश, अहिमहिरावणचरित्राच्याद्वारें " परस्त्रीकडे पापी दृष्टीनें पाहणाऱ्याचा कसा घात होतो, " हें महाराष्ट्रीयांस पटवून देणें, हा कवीचा उद्देश असावा, हें उघड आहे.

महाराष्ट्रीय सैनिक व सेनापति यांची नीतिमत्ता उच्च प्रतीची होती. याचें कारण अशा प्रकारचीं नीतिउपदेश करणारीं व हितपरिणामी कथानकें त्यांच्या वाचनांत येत असत किंवा त्यांच्या कर्णपथावरून तरी जात असत, हें होय. असो.

आतां आपण आपल्या विषयाकडे वळूं:—

शाके १५०९ मध्यें असलेल्या [illegible] दोन प्रसंग ( अध्याय ) असून त्यांतील पहिल्या प्रसंगाची पहिली ओवी —

जो अंतरात्मा अंतरसृष्टु । कमळोद्भवजनकारी — इष्टु ।
तो उर्मियानाचें निर्दाळितु । रणमंडळीं पाडिला ॥ १

ह्या प्रसंगाच्या ओव्या १४६ असून शेवटीं समाविलेख आहे तो —

" इति श्रीयुद्धकांडे मुक्तेश्वरलीला विश्वंभरे प्रसाद । प्रसंग १ ॥"

दुसऱ्या प्रसंगाचा आरंभः—

हरी वेळ उतावेळ चित्तें । सांगों धाविन्नले रघुनाथातें ।
म्हणती प्रभुचेनि सामर्थ्यें । विपरीत कैसें वर्तलें ॥ १

ह्या प्रसंगाची शेवटची म्हणजे १५१ वी ओवी —

इति श्रीयुद्धकांड सुधारसु । संपूर्ण सुलोचनेचा अग्निप्रवेशु ।
विनवी मुक्तेश्वर लीलाविश्वंभरदासु । सुरसु श्रोतीं सेविजे ॥ १५१

ह्या प्रकरणाच्या आरंभीं पूर्व कवींच्या पद्धतीस अनुसरून कोणलाहि देवतेस नमन केलेलें नाहीं, वा कोणाच्या कृपेची वा आशीर्वादाची याचना केलेली नाहीं. यावरून हे दोन्ही प्रसंग दुसऱ्या कोणत्या तरी मोठ्या ग्रंथांतील अध्याय असावे, अशी शंका उत्पन्न झाली. तेव्हां असा कोणता ग्रंथ असूं शकेल कीं, ज्यांतील हे दोन प्रसंग असावेत, असा प्रश्न उत्पन्न झाला. विचार करितां एकनाथकृत भावार्थरामायण व कृष्णदासमुद्गलकृत ( रामायणांतर्गत ) युद्धकांड हीं दोन नांवें सुचलीं. त्यापैकीं दुसऱ्या ग्रंथांत शोध करितां त्याचे अध्याय ४६ व ४७ ते हे च, असें आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. मुक्तेश्वरनामांकित हे सुलोचनागहिंवराचे दोन प्रसंग व कृष्णदासमुद्गलकृत युद्धकांडांतील उपरिनिर्दिष्ट दोन अध्याय परस्परांशीं ताडून पाहतां त्यांत पद्यसंख्या कमी ज्यास्त असून कित्येक पाठांतरेंही आहेत.

कृष्णदासमुद्गलाच्या युद्धकांडाच्या छापील प्रतींतील उपरिनिर्दिष्ट अध्यायांच्या शेवटच्या ओव्या —

( १ ) इति श्रीयुद्धकांड–कथारसु । सुलोचना अग्निप्रवेशु ।
विनवी मुद्गल कृष्णदासु । रामापुढें उभा राहेल ॥
( अध्याय ४६, ओवी १४८ )

( २ ) इति श्रीयुद्धकांडरसु । संपूर्ण सुलोचना अग्निप्रवेशु ।

( १ ) आम्ही हस्तलिखित प्रतींतील व छापील प्रतींतील जे उतारे दिले आहेत त्यांवरून पाठांतरांसंबंधीं कल्पना करितां येण्यासारखी आहे. ओवीबद्ध ग्रंथांत लेखकाला स्वैर संचार करावयास सांपडतो आणि यामुळें एका प्रतीवरून दुसरी व दुसरीवरून तिसरी अशा प्रती करून घेतांना पाठांतरें उत्पन्न होतात. तसें च पद्यसंख्येंतही फरक पडतो, कारण लेखक कांहीं ओव्या आपल्या पदरच्या घालतो, तर मूळांतील कांहीं गाळतोही.

विनवी मुद्गल कृष्णदासु । श्रोते हो कीजे अमृतपान ॥
( अध्याय ४७, ओवी १५३ )

श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ८१४ मध्यें कृष्णदास मुद्गलकृत युद्धकांड आहे. त्यांत वरील अध्यायांच्या शेवटच्या ओव्या आहेत त्या अशा—

( १ ) श्रीवाल्मिकीवदनारविंद । दशवक्त्रनंदन चरित्र मोद ।
चतुरीं सेविजे युक्त श्रद्ध । कृष्णदास मुद्गल म्हणे ॥
( अध्याय ४६, ओवी १४८ )

( २ ) इति श्रीयुद्धकांड सुधारस । पूर्ण सुलोचना अग्निप्रवेश ।
विनवी मुद्गल कृष्णदास । पवित्र कथा परिसिजे ॥
( अध्याय ४७, ओवी १५१ )

एकंदरींत वरील सर्व तपशिलाचा इत्यर्थ, सुलोचना गहिंवर हें प्रकरण मुक्तेश्वरकृत नसून कृष्णदास मुद्गलकृत आहे हा होय.

' महाराष्ट्र कवि ' ( पुणें ) ह्या मासिकांत कृष्णदास मुद्गलकृत रामायण-युद्धकांड ( महाराष्ट्र काव्यग्रंथ-१२ ) हा ओवीबद्ध रसाळ ग्रंथ कै. विनायकराव भावे यांनीं शके १८२९ मध्यें छापिला. ह्या छापील प्रतींत ७८ प्रसंग असून त्या सर्वांची मिळून ग्रंथसंख्या ८७७५ आहे. रामायणांतील कोणत्याहि कांडावर एवढा विस्तृत ग्रंथ मराठींत नाहीं. कृष्णदास मुद्गलाच्या युद्धकांडाचे अध्याय ४६ व ४७ हे, मूळ पाठ ज्यांत कर्त्याचा नामोल्लेख आहे अशा ठिकाणीं बदलून, मुक्तेश्वराच्या नांवावर दडपून देण्याची हातचलाखी लेखकानें केली आहे, हें उघड आहे.

---

( १ ) ह्या छापील प्रतींत एकंदर ओवीसंख्या ८७७५ आहे. बाडांक ८१४ मधील पोथीचा लेखक ' मेघाजि विश्वनाथ लिखते श्रिंगारपुरग्रामवासि ' हा ' ग्रंथसंख्या ॥ ८०००८०० आठ सहस्र आठ शत ' आहे असें लिहितो. बाडांक १४२ मध्यें हें युद्धकांड शके १६६८ मध्यें लिहिलेलें आहे. त्यांत ' ओव्या सुमार ९४५३ ' आहेत, असें ह्या बाडाचे लेखक सातारा येथील दादाजी शामजी सोंपटर व त्याचे बंधु यांनीं म्हटलें आहे. ' श्रीसमर्थचरित्र ' कार रा. आठलेकर ' हा ग्रंथ दहा हजार आहे. ' ( पृष्ठ ४१६ ) असें सांगतात. सारांश ' श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिर ' तील सर्व प्रतींच्या आधारें व आणखी प्रती मिळवून ह्या ग्रंथाचें संपादन सर्वांगपरिपूर्ण असें कोणी तरी करावयास पाहिजे, एवढें खरें.

बाडांक १५०९ मध्यें अहिरावणमहिरावणचरित्र आहे, हें वर सांगितलेंच आहे. त्याचेही दोन प्रसंग आहेत. पहिल्या प्रसंगाचा आरंभ —

बंधु कुमार आणि प्रधान । रणीं झुंझतां पावले मरण ।
तेणें दुःखें दशानन । शोक करी आक्रोशें ॥ १

ह्या प्रसंगाचा शेवट —

इति श्रीयुद्धकांड कथाकुसरी । रामलक्ष्मण चोरिले ऐसिये परी ।
मुक्त होतील ते ऐका श्रोतद्वारीं । मुक्तेश्वर कवि वदे ॥ १४६

दुसऱ्या प्रसंगाचा आरंभ —

मर्गजस्तंभीं आकळिले । ते सोडोनी मार्गा आकर्षिले ।
मौन्यास काढूनी बांधिले । नागपाशीं सुबद्ध ॥ १

दुसऱ्या प्रसंगाची शेवटची ओवी —

इति श्रीयुद्धकांड रामायण । निमाले अहिमहि दोघे जण ।
पुढें परिसोत विचक्षण । मुक्तेश्वर कवि वदे ॥ १५८

बाडांक ९१ मध्यें मुक्तेश्वरकृत विराटपर्व आहे व त्याच्यापुढें 'मुक्तेश्वरकृत अहिरावणमहिरावणवध' हें प्रकरण आहे. अर्थात् '०चरित्र' आणि '०वध' अशीं निरनिराळीं नांवें असलीं, तरी तें एकच प्रकरण होय, हें ही दोन्ही हस्तलिखितें ताडून पाहिलीं असतां दिसून येतें. ह्या दोन्ही प्रतींत कांहीं पाठभेद वगैरे आढळतात, पण तो कांहीं या ठिकाणीं महत्त्वाचा मुद्दा नाहीं.

ह्या प्रकरणाच्याही आरंभाकडे पाहिलें असतां 'बंधु-कुमार आणि प्रधान' ह्या संदिग्ध वर्णनावरून हें स्वतंत्र व स्वयंपूर्ण प्रकरण नव्हे, हें लेक्षांत यावें येतें. तसेंच शेवटच्या 'पुढें परिसोत विचक्षण' ह्या उद्गारांवरून ह्या दोन प्रसंगांच्यापुढें आणखी कांहीं तरी भाग आहे, असें वाटल्याशिवाय राहात नाहीं. सारांश, अहिरावणमहिरावणविषयक हे दोन्ही प्रसंग देखील एखाद्या मोठ्या ग्रंथाचे मधलेच फोडले तरी असावें, आणि ते बहुधा कृष्णदास मुद्गलाच्या युद्धकांडांतील असावे, अशी शंका वाटूं लागली.

---

(१) मुक्तेश्वराच्या काव्यांतील वचनांबरोबरच कृष्णदासमुद्गलाच्या काव्यांतील प्रसंग उतरून घेऊन, त्यांच्या शेवटच्या ओव्यांत कृष्णदासाच्या नांवाच्या ठिकाणीं मुक्तेश्वराचें नांव घालण्याचा उपद्व्याप लेखकांनीं केल्यामुळें आम्ही फसलों. नाहींतर कदाचित् आमची अशी फसगत झाली नसती.

पुढें श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील 'आणखी बाडें' चाळतांना समर्थांची कर्मभूमीच असा चाफळखोऱ्यांत मिळालेल्या बाडांक २६१ संबंधीं '' श्रीरामदासी संशोधन ' ( प्रथम खंड, पृष्ठांक ३०५ ) या पुस्तकांत पुढील नोंद आढळली—

" कृष्णदासमुद्गलकृत युद्धकांडापैकीं अहिरावणमहिरावण–चरित्र — अपूर्ण "

म्हणून हें बाड काढून पाहिलें. त्याच्या पाहिल्या प्रसंगाची शेवटची ओवी अशी—

इति श्रीयुधेकांडे कथाकुसरी । रामें योजिला ऐसिया परी ।
मुक्त होईल ऐकतां चतुरी । कृष्णदासमुद्गल म्हणे ।। १२८

दुसरा प्रसंग अपूर्ण आहे. परंतु वरील ओवी पाहून त्या प्रकरणाचा खरा कर्ता कोण यासंबंधीं आमची शंका बळावली आणि म्हणून आम्ही आणखी बाडें चाळण्यास आरंभ केला तों बाडांक ५२ मध्यें ( हें बाड डोमगांव येथील मठांतील आहे ) कृष्णदासमुद्गलकृत अहिमहिआख्यान सापडलें. पण त्याच्यापूर्वी त्या बाडांत मुक्तेश्वरकृत सभापर्वापैकीं पूर्वघूत हा भाग आहेच ।

मंदिरांतील बाडांक ८१४ मध्यें कृष्णदास–मुद्गल कृत युद्धकांड आहे. ही शके १६४० मध्यें लिहिलेली पोथी सुंदर असून शुद्ध आहे. परंतु ती संपूर्ण आहे किंवा नाहीं याविषयीं आम्हास शंका आहे. के. भावे यांच्या प्रतींत ७८ प्रसंग आहेत परंतु या पोथींत दोन अध्याय ज्यास्त म्हणजे एकंदर ८० आहेत असें सकृद्दर्शनीं दिसतें आणि म्हणून आमची कल्पना अशी झाली होती कीं, हे दोन अध्याय म्हणजे अहिमहिरावणाख्यानाचे दोन प्रसंग असावे. परंतु छापील प्रत बाडांक ८१४ शीं ताडून पाहातां असें आढळून आलें कीं, ते छापील प्रतींत आधींच्या प्रसंगांत समाविष्ट करून घेतलेले आहेतः—

छापील प्रत — बाडांक ८१४

प्रसंग ५२ ओव्या १०७ = { प्रसंग ५२ ओव्या ९७
प्रसंग ५३ ओव्या ९
——
१०६

आणि—

प्रसंग ७५ ओव्या ९९ = { प्रसंग ७६ ओव्या ७५
प्रसंग ७७ ओव्या २४
——
९९

यावरून असा दिसतें छापील प्रतींतील अ. ५२ व ७५ यांचे तुकडे पडल्यामुळें अध्यायांची संख्या केवळ मोजण्या ' दोन ' नीं वाढली आहे. बाडांक ८१४ मधील

अध्याय ५३ व ७७ यांची ओवीसंख्या पाहिली असतां येथे कांहीं तरी लपंडाव कोणीतरी केला आहे असें दिसून येतें. कारण ह्या अध्यायांच्या मागील व पुढील कोणत्याहि अध्यायांची ग्रंथसंख्या पाहिली असतां ९ व २४ ओव्यांचे अध्याय असणें हास्यास्पद दिसतें. एकंदरींत मूळ ग्रंथांत ८० अध्याय असून लेखकानें ( Copyist ) त्यांतील दोन अध्याय उतरून घ्यावयाचें टाळलें. पूर्वी छापखाने नसल्यामुळें विद्याभिलाषी सुसंपन्न सद्गृहस्थ ग्रंथांच्या नकला करवून घेऊन ते आपल्या संग्रहीं ठेवीत असत. नकलनवीसांस त्याबद्दल ते मोबदला देत असत. तेव्हां प्रस्तुत ग्रंथांतील दोन अध्याय गाळून त्यांच्या लिखाईचे पैसे पदरांत पाडून घेण्याची ही लेखकाची युक्ति दिसते ! पण अशी लबाडी करण्यांत त्या लेखकाला फुकटची प्राप्ति तरी कितीशी झाली असेल !

कृष्णदास-मुद्गलकृत युद्धकांडाची ग्रंथसंख्या निरनिराळे लेखक निरनिराळी देतात. यावरून आमची कल्पना अशी आहे कीं, सदर्हू ग्रंथाचा कांहीं भाग अद्याप अप्रसिद्ध म्हणजे कै. भावे यांच्या छापील प्रतींत ज्यांचा समावेश झालेला नाहीं, असा असावा. कै. भावे यांनीं त्या काळीं हा ग्रंथ छापून महाराष्ट्रावर मोठे उपकार केले आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. परंतु त्यांनीं त्याला अनुक्रमणिका दिली नाहीं, की प्रस्तावना जोडिली नाहीं. सदर्हू ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत त्यांना कोठून व कोणाकडून मिळाली, तिचा लेखनकाल व लेखकाचा नामनिर्देश, पोथीचें सामान्य स्वरूप यांपैकीं त्यांनीं कोणत्याहि बाबीचा उल्लेख केलेला नाहीं. ह्यावरून आम्हांला असें वाटतें कीं, त्यांना ह्या ग्रंथाची साद्यंत व संपूर्ण अशी एक प्रत मिळालीच नसावी. त्यांनां ज्या भागाच्या एकपेक्षां ज्यास्त प्रती मिळाल्या तेथे त्यांनीं टीपांत पाठभेद दिले आहेत. पण अ, ब, क व ख अशा चार हस्तलिखितां वरून दिलेले पाठभेद फक्त २०।२१ प्रसंगांपर्यंतच्या भागावरच आहेत. त्यांच्या पुढील अध्याय त्यानीं निरनिराळ्या त्रुटित प्रतींवरून कथानकाच्या अनुरोधानें अध्यायांची जुळवाजुळव करून हा ग्रंथ छापिला असावा. त्यांनीं ह्या ग्रंथाच्या संपादणीसंबंधीं कांहीं खुलासा, ' महाराष्ट्रकवी ' त त्यांनी प्रसिद्ध केलेल्या इतर ग्रंथांप्रमाणें केला असता तर आज आम्हांला असे तर्कवितर्क करीत बसावें लागलें नसतें. असो.

सारांश, सुलोचनागहिंवर व अहिमहिरावणवध हीं प्रकरणें - युद्धकांडाचे विभाग म्हणून या स्वतंत्र म्हणून – मुक्तेश्वरकविकृत नसून हीं

कृष्णदास – मुद्गलकृत युद्धकांडांतील होत, असेंच अगदी स्पष्टपणें दिसून येतें. या आमच्या विधानास भाषेची रचना, शब्दांचें सौष्ठव व वर्णनशैली हीं पुष्टीच देत आहेत.

हीं दोन प्रकरणें मुक्तेश्वराचीं आहेत, असें समजण्यांत आमची फारच मोठी फसगत झाली व निराशादी तशीच झाली. हीं प्रकरणें बाडांक ६१ व १५०९ मध्यें मुक्तेश्वरनामांकित आढळल्यामुळें तीं मुक्तेश्वराचीं असावीं, अशी आमची समजूत झाली आणि ती केसरी ( पुणें ), महाराष्ट्र ( नागपुर ) व निजामविजय ( भागानगर ) या वृत्तपत्रांच्या द्वारें आम्ही मोठ्या आनंदानें महाराष्ट्रीयांच्या कानांवर घातली. परंतु या बाडांच्या लेखकांनीं, आरंभीं ' श्रीवसीस्ट, श्रीरामसमर्थ, गुरु रोकडाजी ' यांचें अत्यंत ढोंगीपणानें नामस्मरण करून कृष्णदासमुद्गलाच्या नांवाच्या ठिकाणीं मुक्तेश्वराचें नांव घालून मूळ पाठ बदलण्याचा खोडसाळपणा कां करावा हें एक आम्हास न उकलणारें कोडें आहे. असा हा खोटेपणा करण्यापासून त्यांनीं प्रपंच वा परमार्थ कसा काय साधला असेल, तें त्यांचें त्यांनाच माहीत !

आजकाल एखादा मनुष्य दुसऱ्याचे लेख, त्याच्या परवानगीशिवाय, आपले म्हणून छापून प्रसिद्ध करितो. पण असें हें वाङ्मयचौर्य करण्यांत त्याचा हेतु येनकेन प्रकारेण द्रव्यसंपादन करणें, किंवा ग्रंथकार म्हणून फुकटची प्रौढी मिरविणें हा असतो. परंतु आम्ही असें समजतों कीं, पूर्वीच्या लेखकांना असा कांहीं स्वार्थ साधावयाचा नसे. असें असतां त्यांनीं एखाद्या मृत ग्रंथकारावर असा अन्याय कां करावा ? त्याच्या ग्रंथसंपत्तीवर डल्ला मारून ती भलत्याच्या जामदारखान्यांत नेऊन कां ठेवावी ? हें त्यांचें त्यांनाच माहीत ! कदाचित् त्यांचें हृद्गत सर्वसाक्षी व सर्वज्ञ परमेश्वरालाच फक्त माहीत असणें संभवनीय आहे !

आपल्या हातून कांहीं अल्पस्वल्प संशोधनकार्य व्हावें, या हेतूनें आम्ही मधून मधून धुळ्यास जाऊन श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या परिसरांत कांहीं काळ

( १ ) वाल्मीकीनें रचिलेलें रामायण शतकोटी ग्रंथात्मक होतें. परंतु देव, दानव, मानव, यक्ष, किंनर, गंधर्व, नाग इत्यादि सर्व त्या सुरस काव्यासाठीं भांडूं लागले. तेव्हां श्रीविष्णूनें त्याचे तीन भाग करून तें स्वर्ग, मृत्यु व पाताळ यांत वांटून दिलें, अशी कथा आहे ( आनंदरामायण, यात्राकांड, सर्ग २ ). सध्या प्रचारांत असलेल्या वाल्मीकिरामायणाची ग्रंथसंख्या पंचवीस हजार आहे. पण त्याखेरीज अध्यात्मरामायण, अद्भुतरामायण व आनंदरामायण इत्यादि रामचरित्र पूर्ण करणारे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

कृष्णदास–मुद्गलानें आपलें युद्धकांड आनंदरामायणाच्या आधारें रचिलें असावें असें दिसतें. त्यांतील सारकांडाच्या ११ व्या सर्गांत अहिमहिरावणाख्यान सुलोचनागहिवर ( इंद्रजितवध ) हा कथाभाग आहे.

घालवितों. त्याप्रमाणें आमच्या एका वेळच्या संशोधनाची ही कडू कहाणी आहे. तथापि सुलोचनागहिंवर व अहिरावणमहिरावणवध हीं ओवीबद्ध प्रकरणें मुक्तेश्वराचीं नव्हेत, तीं कृष्णदासमुद्गलाचीं आहेत, असें ठरलें हें योग्य झालें. नाहीं तर निरनिराळ्या ठिकाणीं आढळणारीं हीं फुटकळ प्रकरणें मुक्तेश्वराचीं आहेत, अशा भ्रमांतच आम्ही राहिलों असतों. पण त्या भ्रमाचा भोंपळा लौकरच फुटला, ह्यांत कांहींच वावगें झालें नाहीं.

आमच्या 'भ्रमाचा भोंपळा' फुटला, कारण तो सडकाच होता, पण त्यांतून दोन बिया हातीं लागल्या आहेतः— ( १ ) माडोत्री किंवा लबाड लेखक मूळांतील कांहीं ग्रंथसंख्या हेतुपुरःसर गाळतो; व ( २ ) एका ग्रंथकाराची कृति दुसऱ्या ग्रंथकाराच्या नांवावर, मूळ पाठ बदलून, दडपून देतो. ह्या दोन्ही संशोधकांनीं आपल्या स्मृतिपटलांत सांभाळून ठेविल्या पाहिजेत.

एकंदरींत, कोणत्याही जुन्या अप्रसिद्ध ग्रंथाचें संशोधन करून तो प्रसिद्ध करण्यापूर्वी लेखकानें ( नकल करणाऱ्यानें ) त्यांत कांहीं कारवाई केली आहे कीं काय हें संशोधकानें बारकाईनें पाहणें अत्यंत महत्वाचें आहे. वर सांगितल्याप्रमाणें लबाड्या एखादा पोटभरु लेखकच करील, आपल्या आवडीचा ग्रंथ स्वयंप्रेरणेनें उतरून घेणारा लेखक अशी हातचलाखी खात्रीनें करणार नाहीं. पण कोणत्याहि जुन्या हस्तलिखिताच्या लेखकाच्या प्रामाणिकपणाची परीक्षा करणें मोठें अवघड काम आहे. म्हणून ज्या ग्रंथाच्या कर्त्यासंबंधीं संशयातीत प्रमाण उपलब्ध नसेल अशा कोणत्याही प्राचीन ग्रंथाच्या प्रत्यंतरासाठीं एकापेक्षां ज्यास्त प्रती मिळविल्या-शिवाय कोणाही संशोधकानें पुढें पाऊल टाकूं नये, असें आमचें मत आहे. कारण अशा प्रकारें नकलनवीसांनीं हातचलाखी केल्याचीं आणखी कांहीं उदाहरणें आमच्या आटळांत आलेलीं आहेत.

उपरिनिर्दिष्ट प्रकरणें मुक्तेश्वरकृत होत असी आमची समजूत झाली होती ती चुकीची ठरली, तरी, एका अर्थी, म्हणजे शंकेची निवृत्ति झाली म्हणून, आमच्या श्रमांचें सार्थक झालें असें आम्ही समजतों. शिवाय, कृष्णदास–मुद्गल व मुक्तेश्वर यांच्यासारख्या सत्प्रवृत्त, सज्जन व सरळहृदय सत्कवींच्या काव्यसंपत्ती-संबंधीं न्याय्य निर्णय झालेला पाहून त्यांच्या पुण्यात्म्यांस समाधान वाटेल, असें आमची मनोदेवता आम्हास सांगत आहे.

ह्या लेखांत थोडें विषयांतर झालें आहे, हें खरें. तथापि ह्या प्रकरणांतील पौराणिक कथानकासंबंधीं कांहीं आनुषंगिक विचार आमच्या मनांत आले ते नमूद करून ठेवण्याची ही आम्हास अनायासें लाधलेली संधी आम्ही साधून घेतली आहे. याबद्दल आम्ही वाचकांपाशीं क्षमेची याचना करून हा लेख श्रीसमर्थ-चरणीं सादर करीत आहों.

| लेखनकाळ | प्रसिद्धिकाळ |
|---|---|
| सज्जनगडची वैशाखवारी शके १८६४ | १८६४ आश्विन शुद्ध ७ |
| ता. २५ एप्रील १९४२ | ता. १६–१०–१९४२ |

(१३)

## " श्रीसमर्थहृदय " ग्रंथावरील कांहीं टिपणें

(लेखक – रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापूर)

---

### (१) तुळजापुरच्या भवानीला तुकाई किंवा रामवरदायिनी हीं नांवें प्रथम कोणी दिलीं ?

श्री एकनाथ महाराजांच्या भावार्थ रामायणांत पुढील वर्णन आढळतें. सीतेच्या शोधार्थ रामलक्ष्मण हे गिरिकंदरीं हिंडत असतांना " पार्वती स्वयें जाली सीता " व ह्या उभयतां बंधूंची " परस्त्री नाणिती दृष्टी " ह्या त्यांच्या शीलाची तिनें परीक्षा पाहिली. पार्वती सीतेचें रूप घेऊन प्रभूंच्या पुढें आली " हें न कळे ब्रह्मादिकां समस्तां ", पण हें तिचें कपट रामांनीं ओळखिलें व तिला ते म्हणतात :

श्रीराम म्हणे तूं काई । तें चि नाम लोकांच्या ठायीं ।
अद्याप राहिलेसें पाहीं । म्हणती तुकाई जगदंबा ॥ २०-६४
तुकाई नामें नामाभिधान । तें जगदंबेचें निजस्थान ।
अद्यापि पूजिती जन । अतिपावन दंडकारण्यीं ॥ ६५
श्रीरामवरदायिनी माता । तुकाई म्हणती रामवाक्यार्था । ६६
(भा. रा. अ. कां.)

श्री नाथांच्या या ओव्यांशीं श्रीसमर्थांचें या च प्रसंगाचें वर्णन ताडून पहावें.

येकांतीं त्या वनामधें । देखिले त्या कुमारीनें ।
कुमारी देखिली त्यांनीं । बोलती ते परस्परें ॥ स्फु. प्र. ६७-१४
कैचीं तुं कोण तुंकाई । नाम तें कोणतें तुझें ।
म्हणे रे मी च तुकाई । जा तुम्हां वर दीधला ॥ १५
× × ×
जननी रामवरदानी । तधींपासुनी बोलिजे । २१

भावार्थ रामायणांतील वरील ओव्यांवरून असें स्पष्ट सिद्ध होत आहे की, श्रीसमर्थां-पूर्वी च तुळजापुरच्या भवानीची "तुकाई" व "रामवरदायिनी" हीं नांवें प्रचलित होतीं. नाथांनीं च तिला प्रथम या नांवांनीं संबोधिलें असावें. श्रीसमर्थांच्या प्रमाणें श्री नाथांनीं हि या आदिमायेवर – तुळजापुरच्या भवानीवर – एक ओजस्वी भारुड केलें आहे.

## ( २ ) त्रयोदशाक्षरी मंत्र श्रीसमर्थांच्या पूर्वींचा च

जटायु मरणोन्मुख होऊन पडला असतांना प्रभु रामचंद्र त्याच्याकडे आले, त्या प्रसंगाचें श्री नाथांनीं पुढील प्रमाणें वर्णन केलें आहे.

सफेत रुधिर वमून । जटायू सांडीत होता प्राण ।
ऐकोनि श्रीरामवचन । जाला सावधान भावार्थें ॥ २१-१४
श्रीराम जय राम जयजय राम । जटायु स्मरे रामनाम ।
माझा छेदावया देहभ्रम । अंतीं श्रीराम पावला ॥ १५

( भा. रा. अ. कां. )

## ( ३ ) श्री नाथांच्या मताप्रमाणें रामावताराचें प्रयोजन

श्रीसमर्थहृदयकारांनीं आपल्या ग्रंथांत ( पृ. १६९ ) यासंबंधीं पुढीलप्रमाणें आपलें मत प्रगट केलें आहे. "वाल्मीकिमुनींच्या मताप्रमाणें, रामानें लंकेवर स्वारी करून देवांना बंदीवासांतून मुक्त केलें, हें खरें आहे, पण ती आनुषंगिक गोष्ट होय, लंकेवर स्वारी करण्यांत श्रीरामाचा मुख्य हेतु सीतादेवीला परत मिळवून कुळाला लागलेला कलंक धुऊन काढावयाचा, हा होता. श्रीसमर्थांनीं या सर्व हेतूंना दुय्यम स्थान दिलें आहे; + + + मुख्य हेतु देवांच्या बंधविमोचनाचा होता." तसें च पृष्ठ १७० वर "श्रीसमर्थांच्या मतें रामायणाची महती सुरबंध-विमोचनामुळें होय" असें म्हटलें आहे.

श्री नाथांनीं हि भावार्थ रामायणांत, देवाची सोडवण फेडावयाची व स्वधर्माची गुढी उभारावयाची, हाच रामावताराचा हेतु असल्याचें अनेकदां सांगितलें आहे. तिघा हि पत्नींना *डोहळे पुसावयास दशरथ राजा त्यांच्या* मंदिरांत गेला. तेव्हां कौसल्येच्या मंदिरांत

राजा म्हणे स्वमुखें कांते । काय आवडी आहे तूंतें ।
वेगीं सांग डोहळियातें । सांडी परतें भ्रमासी ॥ ५-३

दशरथानें कौसल्येला " रांडी परतें भ्रमारी " असें म्हणण्याचें कारण, साक्षात् परब्रह्म तिच्या उदरीं असल्यामुळें स्वरूपीं दृष्टि लागलेल्या कौसल्येला भ्रम झाला आहे अशी त्याची समजूत झाली, हें होय. ती आपल्या निज सुखाच्या गुंगींत च त्याला उत्तर देते :

> येरी म्हणे मी अवघा राम । मजमाजीं तंव कैचा भ्रम ।
> अवतरलों पुरुषोत्तम । देवांचे श्रम फेडावया ॥ ४
>
> ( भा. रा. बा. कां. )

अश्या दशरथाला कौसल्येची ही भूमिका उमगली नाहीं. त्याला वाटलें हिला खरोखर च भूतानें झपाटलें आहे, नाहीं तर ही " मी स्त्री नव्हे, पुरुष नव्हे, नर नव्हे, राक्षस नव्हे, तर ईशाचा ईश पुरुषोत्तम मी आहे, माझ्या ठिकाणीं मी तूं हा भेद नाहीं, इत्यादि " त्याच्यामतें असंबद्ध बरळतीना. गरीब बिचारा दशरथ ! कोणत्या महत् भूतानें तिला पछाडलें आहे, हें त्याच्या लक्षांत येणार कसें ! तिला शुद्धीवर आणावी म्हणून आपल्या लग्नाच्या वेळेची खुणेची एक आठवण तिला देण्याचा प्रयत्न तो करतो व विवाहांत रावणानें कसें विघ्न उत्पन्न केलें ही गोष्ट त्यावेळीं तिला सांगावयास लागतो. रावणाचें नांव ऐकतां च गर्भाच्या आवेश झालेल्या कौसल्येच्या तोंडून निघालेले उद्गार मुळांतून च वाचकांनीं वाचावेत. त्यांत रामावताराचें प्रयोजन काय याचा तिच्या मुखांतून उल्लेख नाथांनीं करविला आहे :

> नांव ऐकोनि रावण । येरी म्हणे दे दे धनुष्यबाण ।
> करूं लंकेचें निर्दाण । मारूं दारुण राक्षस ॥ ५-१०
> पाचारा वनींचे वनचर । मुकुट कुंडलें या अलंकार ।
> राज्य देवोनी धरा छत्र । वानरभार चालवा ॥ ११
>
> × × ×
>
> तोडा नवग्रहांची बेडी । सोडा देवांची बांदवडी ।
> उभवा रामराज्याची गुढी । आज्ञा धडफुडी तिहीं लोकीं ॥ १९
> पाचारा बिभीषण पवित्र । करा राज्याभिषेक धरा छत्र ।
> लंका दिधली स्वतंत्र । यावच्चंद्रदिवाकरौ ॥ २०
>
> नासा रे जगाचीं दुःखें । त्रैलोक्य भरा रे हरिखें ।
> दुमदुमित विश्व सुखें । परम पुरुषें श्रीरामें ॥ २१
>
> ( भा. रा. बा. कां. )

वरील उताऱ्यांत सुग्रीवाला किष्किंधेचें व बिभीषणाला लंकेचें राज्य देण्याचा उद्देश आला आहे, तसा च देवांच्या बंदविमोचनाचा आला आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईल च. हा च अभिप्राय बालकांडाच्या सहाव्या अध्यायांत हि नाथ व्यक्त करीत आहेत :

> करावया बंदविमोचन । सुरनरांसी अभयदान । १५

अध्यायांत पुन्हा तें च सांगत आहेत :

> श्रीराम स्वयें चैतन्यघन । देवकार्यार्थ अवतारपूर्ण ।
> करावया धर्मरक्षण । मनुष्यपण नटनाट्य ॥ ५५

राम वनवासास आले त्याचा उद्देश सीताशुद्धि नव्हे च मुळीं, दीनोद्धरण हा च त्याचा हेतु, असें अरण्यकांडांत नाथांनी एके ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे :

> श्रीरामाचें आगमन । सीताशुद्ध्यर्थ नव्हे जाण ।
> करावया दीनोद्धरण । वनाभिगमन श्रीरामा ॥ २१-१३

किष्किंधा कांडाच्या आठव्या अध्यायाच्या शेवटीं नाथांनीं आणखी एकदां रामावताराचा हेतु पुनः प्रगट केला आहे :

> सुख द्यावया सर्वांसी । श्रीराम आला वनवासासी । १११

तात्पर्य, "रामराज्याची गुढी उभव" ह्याची सुरुवात श्रीनाथांत श्रीसमर्थांच्या पूर्वी च पडूं लागली होती हें वरील उताऱ्यांवरून स्पष्ट आहे.

## ( ४ ) निद्रिस्त कुंभकर्णाला जागृत करण्याचा एक उपाय

निद्रिस्त कुंभकर्णाला जागृत करण्याच्या "त्या सर्व उपायांत एक उपाय, जो वाल्मीकींना सुचला नाहीं आणि समर्थांना सुचला, तेवढा पाहिला पाहिजे", असें श्रीसमर्थहृदयकर्त्यांनीं पृष्ठ १८० वर म्हटलें आहे; व पृष्ठ १८१ वर तो उपाय म्हणजे

> तया किन्नरी रम्य गाती विशेषें । अळापें शिळा चौरती तोय जैसें ।
> जयाचेनि नट्टांग लावण्य वेशें । मनीं होय रामादिका कामपीसें ॥ ४-२२

असा श्रीसमर्थरामायणांतील श्लोक देऊन श्रीसमर्थांचें वाल्मीकीहून वैशिष्ट्य दाखविलें आहे व तें बरोबर हि पण आहे. वाल्मीकींना नसेल सुचला हा उपाय. पण नाथांनीं भावार्थ रामायणांत जे श्लोक उद्धृत केले आहेत, त्या श्लोकांच्या कर्त्यास व त्या श्लोकांच्या आधारें टीका लिहिणाऱ्या स्वतः नाथांस हा च उपाय सुचलेला आहे. भावार्थ रामायणांतील हे पुढील श्लोक पहा :

प्रमदाश्चागतास्तत्र संमृष्टमणिकुंडलाः ।
नागराक्षसकन्याश्च तथा गंधर्वकन्यकाः ॥ ३२
मनुजानां दुहितरः किन्नराणां तथैव च । ३३

× × ×

ताः स्त्रियो गीतवादित्रैः कुंभकर्णाग्रतः स्थिताः । ३४

× × ×

गीतवादित्रशब्देन स्वरेण मधुरेण च ।
दिव्येन चैव गांधर्वस्वरेण विविधेन च ॥ ३५
विबुद्धः कुंभकर्णोऽपि भीमो भीमपराक्रमः । ३६
( भा. रा. यु. कां. अ. २० )

या श्लोकांवरील नाथांच्या तीन चार च ओंव्या पहा :

कुंभकर्णप्रबोधना । करावया संगीत गायना ।
नागकन्या गंधर्वकन्या । राजकन्या आणविल्या ॥
गायों जाणती नाना कुसरी । किन्नरी आणि खेचरी ।
कुंभकर्णमंदिरामाझारीं । त्वरें करी आणविल्या ॥

× × ×

घृताची मेनका रंभा । नारायण दत्त उर्वशी देखा ।
तिसीं मुख्यत्व देवोनि देखा । अष्टनायिका आणविल्या ॥

× × ×

उर्वशीचा चमत्कार । वीणा सज्जोनि सुस्वर ।
प्रबोधिला निशाचर । महावीर कुंभकर्ण ॥
( भा. रा. यु. कां. अ. २० )

उभयतांचे वरील उतारे वाचून वाचकांनीं च आपल्या मनाशीं काय तें ठरवावें.

**टीप** – तीन चार वर्षांपूर्वी भावार्थ रामायण आम्ही वाचलें. तें वाचीत असतां आम्हांस श्री नाथ व श्री समर्थ यांच्या विचारांत व भाषेंत साम्य आढळलें, तेथें तेथें आम्ही खुणा करून ठेविल्या होत्या. त्या आधारें च हें लहानसें टिपण लिहून माधिकांच्या वाचकांपुढें आम्ही आज ठेवीत आहोंत. या उभयतांत साम्य

दर्शविणारी सामग्री हि येथें स्पष्ट आम्ही म्हणून ठेविली आहेत. यथास्थल ती वाचकांपुढें येतील च.

श्रीसमर्थरामायणाप्रमाणें च भावार्थरामायणाकडे अभ्यासकांचें लक्ष गेलेलें दिसत नाही. मराठी भाषेंतील हा एक अमूल्य ग्रंथ आहे. ऐहिक व पारमार्थिक ध्येयें साध्य करून देण्याचें सामर्थ्य त्यामध्यें आहे. अध्यात्मबोध त्यांत सर्व तऱ्हेचें साच भरपूर आहे. वाचकांचें लक्ष या ग्रंथाकडे जावें, अशी त्यांस नम्र विनंति आहे. श्रीसमर्थांच्या ग्रंथाचा आदरपूर्वक अभ्यास करणारांस अशी सूचना करावीशी वाटते की, श्री नाथांच्या ग्रंथाच्या अध्ययनाशिवाय त्यांचें समर्थवाङ्मयाचें अध्ययन पूर्ण झालें, असें म्हणतां यावयाचें नाही.

लेखनकाळ दि. ७ — ९ — १९४२

प्रसिद्धिकाळ दि. १६ — १० — १९४२



॥ श्री गुरुः शरणम् ॥

# श्रीसमर्थांच्या आचाराचें धर्मशास्त्रदृष्ट्या परीक्षण

( लेखक – रा. शांतारामशास्त्री भागवत चांफळकर,
व्याकरणाचार्य, व्याकरणतीर्थ,
अध्यापक, संस्कृत पाठशाळा, राजापूर )

श्रीरामदास आणि रामदासी या मासिकाचा शके १८६४-ज्येष्ठ शु॥ १२ चा अंक व त्यांतील श्री. शंकरानन्द भारती यांचा " श्री समर्थांच्या सदाचाराचा विमर्श " हा लेख वाचला. त्यांत विद्वान् लोकांनीं धर्मशास्त्रदृष्ट्या परीक्षण करावें असें हि लिहिलेलें आढळल्यामुळें, सुदाम पानाच्या पुस्तकांतील श्री. कारखानीस व श्री. दुर्गारामशास्त्री यांचे हि लेख ( शंकोत्तरें ) पहावे लागले. व त्यावरून शंका, प्रतिशंका, उत्तरें, यांची माहिती झाली; आणि त्याबद्दलचा च हा " विमर्श " असल्यामुळें त्या लेखांचा हि त्याबरोबर च विचार करणें प्राप्त झालें. श्री. शंकरानन्द भारतींनीं जी विवादस्थलें म्हणून निर्दिष्ट केली आहेत, तीं योग्य च आहेत. आणि आम्ही हि तेवढ्या च पुरता कांहीं विचार करावयाचें प्रस्तुत योजिलें आहे. तथापि तत्पूर्वी श्रीसमर्थ किंवा एतत्सदृश इतर अवतारी थोर व्यक्ति यांच्या चरित्राकडे पहाते वेळीं कोणत्या दृष्टीचा अवलंब करावा, हें च लक्षांत घेतलें पाहिजे.

श्री समर्थ रामदासस्वामी हे थोर अवतारी पुरुष होते, व धर्मरक्षणार्थ च यांचा अवतार होता, ते परम ज्ञानी व अलौकिक सामर्थ्यसम्पन्न होते ही गोष्ट सर्वश्रुत च आहे. व श्री. कारखानीस यांनीं आपल्या लेखाच्या प्रारंभीं च ती उल्लेखिली हि आहे. *अलौकिक व ज्ञानसंपन्न अशा अवतारी पुरुषांच्या आचरणाचा सूक्ष्म* अभ्यास करतेवेळीं, अभ्यासकाला हि तशी च अलौकिक दृष्टी प्राप्त झाली पाहिजे, असें आम्हांस वाटतें. आणि म्हणून च भगवान् श्रीकृष्णांना हि आपलें दिव्य, अलौकिक, विश्वरूप दाखविण्यासाठीं परम भक्त अशा अर्जुनाला हि

न तु मां शक्यसे द्रष्टुं अनेनैव स्वचक्षुषा ॥

असें सांगावें लागलें आणि

पिता नाम कुर्यात् द्व्यक्षरं चतुरक्षरं वा

या सूत्राप्रमाणें एखाद्याला द्व्यक्षरनाम ठेवावयाचें असल्यास त्याला शर्मा, वर्मा इ. एवढें च नांव ठेवावें लागेल. म्हणजे द्व्यक्षर नामाचा विधी च व्यर्थ होईल. म्हणून हीं सर्व उपपदें आहेत असें च म्हणणें योग्य आहे, व तें च मनुस्मृतीच्या टीकेंत ( शर्मवद् ब्राह्मणस्यस्यात् इ..अ: २ श्लो. ३२ ) कुल्लूकभट्टांनीं स्पष्ट केलें आहे. यावरून ब्राह्मणांनीं दास हें उपपद आपल्या नामापुढें लावूं नये इतका च निषेध आहे. रामदास या नांवांतील दास हें उपपद नव्हतें. त्याचप्रमाणें कालिदास, भानुदास इत्यादि नांवें प्रसिद्ध आहेत च. शिवाय उपपदसहित नाम हें नामकरण-प्रसंगीं पित्रादिकांनीं ठेवावयाचें आहे, स्वतः ठेवावयाचें नव्हे.

**( २ ) श्रीसमर्थ रामदासांचा आश्रम—** श्रीसमर्थांनें समावर्तन झाल्यानन्तर विवाहप्रसंगीं ते गृहत्याग करून निघून गेले. अर्थात् त्यांचा ब्रह्मचर्याश्रम समाप्त झाला होता व विवाह झाला नसल्यामुळें ते गृहस्थाश्रमी नव्हते. म्हणून

अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः ॥

या निषेधास ते पात्र होते, ही मूळ शंका — तिचें उत्तर पं. दुर्गाराम रामदासी व श्री. शंकरानन्द भारती या उभयतांनीं ते 'आजन्म स्नातक होते, व अशा स्नातकांना " अनाश्रमी न तिष्ठेत ". हा निषेध लागूं पडत नाहीं ' असें दिलें आहे. याविषयीं आमचें म्हणणें असें आहे — प्रथम " अनाश्रमी न तिष्ठेत " या वचनाचा अर्थ काय व तें कोणाला उद्देशून सांगितलें आहे, हा विचार केला पाहिजे. हें वचन, दक्षस्मृतीच्या प्रथमाध्यायांतील १० या श्लोक आहे. तें असें :

अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विज : ।
आश्रमेण विना तिष्ठन् प्रायश्चित्तीयते हि स : ॥

यामध्यें कोणत्या हि द्विजानें केव्हां हि अनाश्रमी राहूं नये, तसें राहिल्यास तो प्रायश्चित्तार्ह होतो असें सांगितलें आहे. यामध्यें द्विज ( मग तो कोणत्या हि आश्रमाचा ) हा उद्देश्य आहे. स्नातक किंवा विधुर असा विशिष्ट निर्बंध नाहीं. आणि अनाश्रमी राहूं नये यांतील अनाश्रमी पदाचा अर्थ त्या त्या आश्रमाचे धर्म न पाळणारा असा च त्या दक्षस्मृतींत केला आहे. तीं वचनें अशीं—

मेखला जिनदण्डेश्च ब्रह्मचारीति लक्ष्यते ।
गृहस्थो दानवेदाद्यैर्नखलोमैर्वनाश्रमी ॥ दक्ष १, १३
त्रिदण्डेन यतिश्चैव लक्षणानि पृथक् पृथक् ।
यस्यैतल्लक्षणंनास्ति प्रायश्चित्ती ह्यनाश्रमी ॥ १४ ॥

प्रथम ' द्विजानें अनाश्रमी राहूं नये ' असें सांगितल्यानंतर अनाश्रमी म्हणजे काय, हें सांगणें ओघानें च प्राप्त झालें. हें जाणून च स्मृतिकारांनीं लागली च अनाश्रमी कोणाला म्हणावें याचें स्पष्टीकरण या दोन श्लोकांनीं केलें आहे. त्यांचा अर्थ स्पष्ट च आहे. व त्यावरून पाहतां चार हि आश्रमामध्यें सांगितलेलीं लक्षणें न पाळणारा द्विज अनाश्रमी होतो व तो प्रायश्चित्तार्ह होतो, हें उघड आहे. तेव्हां श्री. दुर्गारामशास्त्री व श्री. शंकरानन्द भारती यांनीं मस्करीय भाष्याच्या आधारें ' हा निषेध विधुरपर आहे ' असें जें लिहिलें आहे, तें स्वतः दक्षस्मृतीच्याच विरुद्ध आहे.

तसें च ज्याप्रमाणें समावर्तनानंतर विवाद न करितां राहणें शास्त्रशुद्ध असल्याचें त्यांनीं दाखविलें आहे, त्याप्रमाणें च भार्यामरणानंतर हि पुनः विवाहेच्छा नसल्यास विवाह न करितां राहणें हें हि शास्त्रशुद्ध आहे. व म्हणून च

तस्मादपत्नीकोऽग्निहोत्रमाहरेत । तदेपाभियज्ञगाथागीयते,
यजेत्सौत्रामण्यमपत्नीकोऽप्यसोमपः । मातापितृभ्यामनृणार्थात् ।

इत्यादि श्रुतिस्मृतिवचनें, व

दारकर्मणि यथशक्त आत्मार्थमग्न्याधेयम्

हें आपस्तंब सूत्र, यामध्यें विधुराला हि अग्निहोत्र स्पष्टपणें सांगितलें आहे.

दाहयित्वाऽग्निहोत्रेण स्त्रियं वृत्तवतीं पतिः
आहरेद्विधिवद्दारानग्नींश्चैवाविलंबयन् ॥ याज्ञ. १।८९
भार्यायै पूर्वमारिण्यै दत्वाऽग्नीनन्तकर्मणि ।
पुनर्दारक्रियां कुर्यात् पुनराधानमेव च ॥ मनु

इत्यादि वचनें पुनर्विवाहेच्छुविषयक आहेत. विवाहेच्छा नसल्यास त्यांनीं

मृतायामपि भार्यायां वैदिकं न त्यजेत्द्विजः ।
उपाधिनाऽपितत्कर्म यावज्जीवं समापयेत् ॥ विष्णुकात्यायनौ
एवं कृते तु विधुरो गृहस्थसदृशोभवेत् ।
अनाश्रमस्यदोषोऽस्य नास्तीत्याहाऽऽश्वलायनः ॥

इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें उपाधि ( स्त्री प्रतिनिधि सौवर्ण प्रतिमादि ) करून हि श्रौतस्मार्त धर्म पाळावेत; व तसे आश्रमधर्म पाळले असतां अनाश्रमस्य दोष हि ( दक्षस्मृत्युक्त ) लागत नाहीं, असें आम्ही पूर्वी दिलेल्या दक्षस्मृतीच्या वचनास अनुसरून च आश्वलायनांनीं हि स्पष्ट सांगितलें आहे. भगवान् श्रीरामचंद्रांनीं सीतात्यागानंतर पत्नीची सुवर्णप्रतिमाकरून च अश्वमेधादि यज्ञ

केले, हें प्रसिद्ध च आहे. यावरून पाहतां " अनाश्रमी न तिष्ठेत " इत्यादि वचन विधुरविषयक च आहे, हें म्हणणें कसें योग्य होईल? संन्यासी, ब्रह्मचारी, वानप्रस्थ, गृहस्थ, यांनीं आपापले आश्रम स्वीकारल्यानंतर, त्या त्या आश्रमाचे नियम पुरों च पाळले नाहींत, व स्वैर वर्तन केलें, तर त्यांना आश्रमी च म्हणावयाचें काय? आमच्या मतें पूर्वोक्त दक्षवचनाप्रमाणें ते अनाश्रमी ठरतात. व म्हणून च ते प्रायश्चित्तार्ह होतात. परंतु हें वचन " विधुरपर " असें म्हटल्यास, वरील आश्रमधर्म न पाळणारे दोषी ठरणार नाहींत, अशी अवस्था होईल. याचा सुज्ञ वाचक विचार करतील च. असो.

प्रस्तुत दोन्ही लेखकांनीं श्रीसमर्थ हे स्नातक होते, असें प्रतिपादन केलें आहे. त्यांत श्री. शंकरानन्द भारतींनीं " सर्व ग्रंथांत विवाहापर्यंत स्नातक असा शब्द वापरला आहे, " असें एक वाक्य लिहिलें आहे. यावरून विवाहानन्तर स्नातक म्हणणें अशास्त्र आहे असें व्यक्त होतें. परन्तु

> स विधिपूर्वं स्नात्वा भार्यामधिगम्य यथोक्तान्
>
> गृहस्थधर्मान्प्रयुंजान इमानिव्रतान्यनुकर्षेत्स्नातकः । गौ., ९।१

या सूत्राच्या टीकेमध्यें —

> स्नातकेस्यस्योपादानं संज्ञार्थं, योवक्ष्यमाणव्रतान्यनुतिष्ठेदसौ
>
> गृहस्थः स्नातक इत्युच्यते इति

जो पुढें ( पुढील ग्रंथांत ) सांगावयाचीं व्रतें आचरील, तो गृहस्थ स्नातक संज्ञेस पात्र होतो, असें म्हटलें आहे व या च सूत्रामध्यें यथाविधि स्नान करून भार्या-स्वीकार केल्यावर पूर्वी ( गौ. अ. ४ ) सांगितलेले धर्म ( गृहस्थाचे ) आचरीत असतां च हीं व्रतें ( गौ. अ. ९ मधील ) आचरावीं व तीं आचरल्यास

> स्नातकः शाश्वत् ब्रह्मलोकान्न च्यवते न च्यवते ।

असें या व्रताचरणाचें फळ याच अध्यायाच्या शेवटच्या सूत्रांत सांगितलें आहे. तसें च

> अतोऽन्यतमयावृत्त्या जीवंस्तुस्नातको द्विजः । ४।११
>
> राजतो धनमन्विच्छेत्संसीदन्स्नातक क्षुधा ॥ ४।३३
>
> न सीदेत्स्नातको विप्रः । ४।३४
>
> एषोदिता गृहस्थस्य वृत्तिर्विप्रस्य शाश्वती ।
>
> स्नातकव्रतकल्पश्च सत्त्ववृद्धिकरः शुभः ॥ ४।२५९
>
> अमावास्यामष्टमीं च पौर्णमासीं चतुर्दशीम् ।
>
> ब्रह्मचारी भवेन्नित्यमप्यृतौ स्नातको द्विजः ॥ मनु. ४।१२८

वसीत चर्मचीरं वा सायं स्नायात्प्रगेतथा ।
जटाश्च बिभृयान्नित्यं श्मश्रुलोमनखानिच ॥ मनु. ६।६

अप्रयत्नः सुखार्थेषु ब्रह्मचारी धराशयः ।
शरणेष्वममश्चैव वृक्षमूलनिकेतनः ॥ ६।२६

ग्रामादाहृत्य वाश्नीयादष्टौग्रासान्वनेवसन् ।
प्रतिगृह्य पुटेनैव पाणिना शकलेन वा ॥ ६।२८

एताश्चान्याश्चसेवेत दीक्षाविप्रो वने वसन् ॥ ६।२९

उपस्पृशंस्त्रिषवणं पितृन्देवांश्चतर्पयेत् ।
तपश्चरंश्चोग्रतरं शोषयेद्देहमात्मनः ॥ ६।२४

या वचनांत सांगितल्याप्रमाणें श्रीसमर्थांनीं समावर्तनानंतर विवाहप्रसंगीं गृहत्याग करून अरण्यवास स्वीकारिला. तेथें त्रिकाळ स्नान करून, पाण्यांत राहून, देहशोषण करून, उग्रतर तपश्चर्या केली. ब्रह्मचर्य पालन केलें. जटा लोम इत्यादि धारण केलें. जवळच्या च गांवांत भिक्षा ( माधुकरी ) मागून निर्वाह केला. शरीरसुखाची यत्किंचितही अपेक्षा न करितां, वनांतील गुहेंत च वास केला. आणि अशा रीतीनें ईश्वराला प्रसन्न करून, ज्ञानप्राप्ति करून घेतली. हें सर्व वर्तन पूर्वोक्त वानप्रस्थधर्मांशीं सुसंगत असल्यामुळें, आमच्या मतें श्रीसमर्थ वानप्रस्थाश्रमी होते असें म्हणणें अधिक युक्त होय; सुज्ञ समर्थभक्तांनीं व इतर वाचकांनीं याचा विचार करावा.

( ३ ) कोरान्न भिक्षा — श्रीसमर्थांनीं कोरान्न भिक्षेचा सांप्रदाय सुरु केला तो अशास्त्र आहे अशी शंका – व तिचें उत्तर " समर्थ हे स्नातक असल्यामुळें त्यांना

यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ ।

हा नियम लागू नाहीं " असें दिलें आहे. परन्तु " यतिश्चब्रह्मचारी " या वचनाच्या अर्थाकडे कोणी हि लक्ष दिलेलें नसावें असें वाटतें; नीट लक्ष दिलें असतें तर ही शंका च उद्भवली नसती. हें वचन पराशर स्मृतीमध्यें ( अ. १।५१ येथें ) गृहस्थाश्रमाच्या विषयांत आलें आहे. गृहस्थानें वैश्वदेवाचयापूर्वी यती व ब्रह्मचारी भिक्षेस आले असतां काय करावें, अशी शंका आली तिचें उत्तर –

वैश्वदेवेतु संप्राप्ते भिक्षुके गृहमागते ।
उद्धृत्य वैश्वदेवार्थं भिक्षुकं तु विसर्जयेत् ॥ प. १।५०

म्हणजे वैश्वदेवाकरितां अन्न वेगळें काढून भिक्षा घालावी असें दिलें आहे व तसें न केल्यास गृहस्थास दोष लागतो हें सांगण्याकरितां " यतिश्चब्रह्मचारी च " हें वचन लिहिलें आहे. याचा अर्थ— यती व ब्रह्मचारी हे गृहस्थाच्या पक्वान्नाचे स्वामी ( धनी ) आहेत. म्हणून त्यांना दिल्यावाचून भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें, असें त्या च वचनाच्या उत्तरार्धांत ( ' तयोरन्नमदत्त्वा तु भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ' । ) सांगितलें आहे. अर्थात् यती ब्रह्मचारी यांना केवळ शिजविलेलें अन्न च विहित आहे, असा जो अर्थ केला गेला आहे तो योग्य नाहीं व म्हणून च त्यावर आधारलेलीं शंकासमाधानें हि अयोग्यच आहेत असें आम्हांस वाटतें.

वास्तविक पाहतां चार हि आश्रमामध्यें ब्राह्मणाला भिक्षा मागण्याचा विधि स्मृतीमध्यें सांगितला आहे.

ऋतामृताभ्यां जीवेत मृतेन प्रमृतेन वा ॥ मनु. ४।४

यामध्यें ( मृतन्तु याचितं भैक्षं ) मृतानें म्हणजे याचित भिक्षेनें आपली उपजीविका गृहस्थानें करावी असें गृहस्थाला भिक्षाविधान आहे. तसें च —

तापसेष्वेव विप्रेषु यात्रिकं भैक्षमाहरेत् ॥ मनु ६।२७

ग्रामादाहृत्यवाश्नीयादष्टौग्रासान्वनेवसन् ॥ ६।२८

यामध्यें वानप्रस्थाला भिक्षा सांगितली आहे. यती ब्रह्मचारी यांना—

यतयो भिक्षार्थं ग्रामं प्रविशन्ति, अथ भिक्षाचर्यां चरन्ति ॥

ब्राह्मणेषु चरेद्भैक्षमनिन्द्येष्वात्मवृत्तये ॥ याज्ञ. १।२९

इत्यादि श्रुतिस्मृतिवाक्यांमध्यें भिक्षेचें विधान केलें आहे. व या च दृष्टीनें श्रीसमर्थांनीं सामान्यपणें

ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा ।

असें सांगितलें आहे. परंतु आश्रमांमध्यें निंद्य गृहीं भिक्षा मागूं नये. अभिशस्त, पतितादिकांचीं गृहें वर्ज करावीत, धोणाऱ्या हातची भिक्षा घ्यावी, कोणाच्या हातची घेऊं नये इ. अनेक विधिनिषेध शास्त्रांत सांगितलेले आढळतात. श्रेष्ठांनीं हि

अनिंद्य विप्रगृहीं मागावें । वर्जावें निंद्य जनांसि ॥

या ओवीनें वरील याज्ञवल्क्य वचनाचा च अनुवाद केला आहे. आतां सर्व आश्रमीयांस व ब्रह्मचारी वर्णत्रयाला सांगितलेली — ( पुढील वचनानें )

ब्राह्मणक्षत्रियविशाश्चरेयुर्भैक्षमन्वहम् ।

सजातीयगृहेष्वेव सार्ववर्णिकमेव वा ॥

भिक्षा केवळ पक्वान्नाची च आहे की काय हा विचार करूं. भिक्षेच्या विधानां

याय अशी एक शंका उपस्थित केलेली आहे. तिचें उत्तर असें कीं, हीं वचनें पतिशुश्रूषाप्राशस्त्य बोधक म्हणजे अर्थवादरूप च आहेत, असें समजलें पाहिजे. नाहीं तर केवळ सभर्तृक स्त्रियांना उद्देशून च जीं नित्यनैमित्तिक व्रतें उपवास वगैरे शास्त्रांत सांगितले आहेत, ते सर्व निरर्थक होणार नाहींत काय ? यावरून पतिशुश्रूषेला प्राधान्य देऊन पतीच्या अनुज्ञेनें व्रतोपवासादिक करावें, असें च सिद्ध होतें. आणि तें च मेधातिथीनें

व्रतोपवासावपि कुर्वती तदनुज्ञां गृह्णीयात्

असें या च श्लोकाच्या टीकेंत स्पष्ट म्हटलें आहे. तसें च —

स्त्रीणामप्यधिकारोऽस्ति विष्णोराराधनादिषु ।
पतिप्रियरतानां च श्रुतिरेषा सनातनी ॥

असें पद्मपुराणांत हि वचन आहे. यावरून सुद्धां पतिशुश्रूषारत स्त्रियांना हि विष्णुपूजनादिकांचा अधिकार आहे, असें स्पष्ट दिसून येईल.

दुसरें असें कीं, उत्तम श्रेयस् म्हणजे आत्मज्ञान, तें मिळविण्याची इच्छा असलेल्या व्यक्तीला योग्य गुरु केल्यावांचून भागणार नाहीं, हें " आचार्यवान् पुरुषो वेद " किंवा " तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् " इ. अनेक वचनांवरून सिद्ध आहे. स्त्रियांना सुद्धां पतिशुश्रूषेनें जरी स्वर्गादिकांची प्राप्ति झाली, तथापि

दिवःपुनरिहायाता सुखानामम्बुधिर्भवेत् ॥ ( कात्यायन १६।१२ )

म्हणजे स्वर्गांतून पुन्हा या लोकीं जन्म घेऊन सुखसंपन्न होते. अर्थात् जन्ममरणाचा फेरा चुकविणारा मोक्ष केवळ पतिशुश्रूषेनें प्राप्त होत नाहीं. त्या करितां गुरूचा च आश्रय केला पाहिजे, व तो गुरु शाब्दपर ( आनुभविक ) ज्ञानामध्यें निष्णात असा असला पाहिजे, हें

शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपरामाश्रयम् ॥

या श्लोकार्धानें स्पष्ट केलें आहे. या ब्रह्मज्ञानाविषयीं जिज्ञासु ( ज्ञानेच्छु ), मग तो स्त्रीपुरुषब्राह्मणादि कोणी हि असो, तो सर्व अधिकारी आहे. फार काय ! विशेष बुद्धि असणाऱ्या तिर्यग्योनींना सुद्धां ज्ञानाधिकार आहे, असें पुराणादिकांवरून दिसून येतें. मग मनुष्य जातींतील स्त्रियांना तो अधिकार आहे यांत विशेष तें काय ! आतां अशा जिज्ञासु स्त्रियांनीं ज्ञानप्राप्तीसाठीं गुरु करावयाचा तो पती च गुरु करावा, कीं, अन्य गुरु करावा, या विषयीं विचार केला असतां असें दिसून येतें कीं, गुरूची योग्यता ( शाब्दे परे च निष्णातं इ. ) जी शास्त्रांत सांगितली आहे, अशा प्रकारचा गुरु मग तो पति, पिता, पुत्र अथवा इतर स्त्रीपुरुष कोणी हि असो,

त्याला शरण जाऊन त्याच्याजवळून ज्ञानप्राप्ति करून घ्यावी, असें स्पष्ट होतें. " पतिरेव गुरुः स्त्रीणां " या वाक्यांतील गुरुपदाचा अर्थ ज्ञानदाता गुरु असा नसून, पूज्य व्यक्ति इतका च आहे हें वर सांगितलें आहे च. आणि जर तेथील गुरुपदाचा अर्थ ज्ञानदाता गुरु असा केला, तर या श्लोकांतील सर्व गुरुपदांचा अर्थ तसा च करावा लागेल. आणि कोणता हि राजा, कोणता हि ब्राह्मण व कोणी हि संन्यासी, हे सर्वांचे ज्ञानदाते गुरु म्हणण्याचा अनवस्था प्रसंग ओढवेल. म्हणून तेथील गुरुपदाचा अर्थ प्रकरणानुरोधानें पूज्य व्यक्ति इतका च करणें योग्य आहे.

आतां स्त्रियांनीं गुरु करावयाचा असतांना त्यांचा पति जर याज्ञवल्क्याप्रमाणें ( ' शाब्दे परे च निष्णातं ' असा ) असेल तर तो च गुरु करणें हें सान्निध्य व साहचर्य यामुळें युक्त ठरेल हें वेगळें. परन्तु स्त्रियांनीं पति च गुरु केला पाहिजे, अन्य गुरु करूं नये असें मात्र मुळीं च नाहीं. हें येथें स्पष्ट लिहिणें अवश्य वाटतें. तसेंच —

" मृगीदृशां विशेषेण मंत्रा एते सुसिद्धिदाः ॥

( हे मंत्र स्त्रियांना विशेषे करून सिद्धि देणारे आहेत. हा अर्थ )

न वैदिकं जपेच्छूद्रः स्त्रियश्चैव कदाचन ।
नमोऽन्तः शिवमंत्रो वा वैष्णवो वेष्यते बुधैः ॥

अशीं हि वचनें स्त्रियांच्या मंत्रग्रहणाविषयीं आहेत. अर्थात् स्त्रियांना गुरूकडून मंत्र घेण्याचा पूर्ण अधिकार आहे हें यावरून च स्पष्ट होतें आणि म्हणून च श्रीसमर्थांनीं केलेलें हें कर्म ( स्त्रियांना शिष्या करून मंत्रोपदेश करणें ) शास्त्रानुसारि च आहे हें उघड च आहे. असो.

( ५ ) गुरुत्वाधिकार— स्त्रियांना जसा ज्ञानप्राप्ति करून घेण्याचा अधिकार वर सांगितला आहे, तसा च तें ज्ञान प्राप्त झाल्यावर दुसऱ्या कोणा हि मुमुक्षूला ( जिज्ञासु ) तें ज्ञान देण्याचा हि अधिकार शास्त्रकारांनीं त्यांना दिला आहे. अर्थात् [illegible] साधनीभूत मंत्र उपासनादि देण्याचा हि अधिकार त्यांना आहे, हे

साध्वी चैव सदाचारा गुरुभक्ता जितेंद्रिया ।
सर्वमंत्रार्थ तत्त्वज्ञा सुशीला पूजनेरता ॥ गुरुयोग्या भवेत्सा हि

इत्यादि वचनांवरून स्पष्ट होतें. तसें च [illegible] स्त्रिया [illegible] जो मंत्र करील त्याचा—

## सिद्धारिशादि धनितामृणतांच न शोधयेत

मंत्रशास्त्रीय सिद्धारिशोधन किंवा ऋणधन शोधन करण्याचें कारण नाहीं, असें हि सांगितलें आहे. यावरून हि मंत्र ( उपासनेचा ) देण्याचा अधिकार व घेण्याचा अधिकार स्त्रियांना आहे, हें उघड होतें. आणि श्री. शंकरानन्द भारतींनीं याविषयीं जें लिहिलें आहे, तें आम्हांस हि योग्य वाटतें. कारण

> ब्राह्मणः सर्वकालज्ञः कुर्यात्सर्वेष्वनुग्रहम् ॥
> तदभावे द्विज श्रेष्ठः शान्तात्माभगवन्मयः ॥ ना. पं.

किंवा– " गुरुर्योग्यामवेत्सादि " इत्यादि वचनांचा विचार करितांना, मुख्यतः ब्राह्मण, तदभावीं द्विज म्हणजे त्रैवर्णिक, तसें च स्त्री इत्यादिक हि अधिकारपरत्वें गुरु होऊं शकतात, असें अनेक मंत्र शास्त्रीय ग्रंथामध्यें सांगितले आहे. मात्र ते पूर्वी सांगितल्याप्रमाणें शाब्द व परज्ञानांत निष्णात असून, शिष्याचा संशयच्छेद व समाधान करणारे असले पाहिजेत इतकें च.

या वरील दोन सूत्रांच्या विवेचनाचा सारांश इतका च कीं, जिज्ञासु स्त्रियांना हि गुरुकडून आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा अधिकार आहे. तसें च तें आत्मज्ञान व तदनुकूल मंत्रदीक्षा इ. इतरांना देण्याचा हि अधिकार शास्त्रांत सांगितला आहे. व तो गुरु पति च असला पाहिजे असें नाहीं; हें विचारी वाचकांच्या लक्षांत येईल यांत संशय नाहीं. " म्हणून च याविषयींचे श्रीसमर्थांचें आचरण शास्त्रानुसारी च असल्यामुळें, श्रीसमर्थ हे स्वतंत्र ( शास्त्रविरुद्ध ) आचारविचाराचे प्रवर्तक नव्हते " असें आम्ही म्हणतों.

( ६ ) **समर्थांचा वेष**— श्रीसमर्थ कौपीन ( लंगोटी ) कफनी, छोटी हीं वस्त्रें कुरमुडी ( भगवीं ) धारण करीत व हातामध्यें कुबडी धारण करीत, हें सर्वश्रुत च आहे. समर्थशिष्या श्री वेणाबाई यांनीं हि यासंबंधीं वर्णन केलें आहे —

> पायीं पादुका हातांत तुंबा । भरजरी भगवी फाकली प्रभा ।
> कटिबंध कौपीन मळसूत्र शोभा । न वानवे मूर्ति साजिरी ॥

यावरून श्रीसमर्थ भगवीं वस्त्रें धारण करीत असत हें स्पष्ट दिसतें. व तशीं वस्त्रें धारण करण्याला, आम्हीं पूर्वी लिहिल्याप्रमाणें वानप्रस्थाश्रम्यास कोणत्या हि स्मृती-मध्यें निषेध आढळत नाहीं. व म्हणून या वेषधारणांत हि श्रीसमर्थांनीं स्वतंत्र ( शास्त्रविरुद्ध ) आचारविचाराची प्रवृत्ति केली, असें समजण्याचें कारण नाहीं.

( ७ ) या शिवाय मूळच्या लेखामध्यें स्त्रियांस व शूद्रांस ब्रह्मविद्येचा अधिकार, वेदाधिकार इ. उपविषय आलेले आहेत. परन्तु त्या सर्वांचा विचार

करूं लागल्यास विस्तार फारच होईल. म्हणून त्यांचे विवेचन करणें, श्री. विद्याशंकर-भारतींप्रमाणें आम्हांस हि अवश्य वाटत नाहीं. तथापि ब्रह्मविद्येचा अधिकार व वेदाधिकार हे दोन्ही पदार्थ भिन्न आहेत. ब्रह्मविद्याधिकारी हा वेदाधिकारी असलो च असें नाहीं, आणि वेदाधिकारी हा ब्रह्मविद्याधिकारी असला च पाहिजे, असा नियम नाहीं. वेदाचा अधिकार द्विजांस (त्रैवर्णिकांस) आहे. आणि ब्रह्मविद्येचा अधिकार साधनचतुष्टयसंपन्न जिज्ञासु व्यक्तीस आहे, हें विद्वज्जनांस माहित च आहे. मूळच्या लेखांत या दोन विषयांचें ऐक्य कल्पून शंका उपस्थित झालेल्या दिसतात; अर्थात च हा वरील विवेक केला असतां त्या शंकांचा फोलपणा सहज दिसून येईल.

श्रीसमर्थांच्या वाङ्मयांतील वाक्यांचा परस्पर विरोध हि शंकाकारांनीं मांडल्याचें दिसतें. परंतु त्या बाबतींत हि शास्त्रीय पद्धतीनें विचारपूर्वक समन्वय केला असतां, कोणता हि दोष आढळेल, असें आम्हांस वाटत नाहीं. म्हणून आम्ही त्याविषयाचें विवेचन न करितां, श्री. शंकरानन्दभारतींनीं निवडलेल्या विवादस्थलांचा च तेवढा विचार या लेखांत केला आहे. आणि प्रस्तुत विषयांशीं त्याचा तितकासा संबंध हि नाहीं. असो! या वरील विवेचनावरून श्रीसमर्थ हे स्वतंत्र (शास्त्रविरुद्ध) आचारविचाराचे प्रवर्तक नसून, श्रुतिस्मृतिविहित सनातन वैदिक धर्मांचे च प्रवर्तक व प्रतिपालक होते, असें स्पष्ट होतें. लेखाचा विस्तार नाइलाजानें अधिक झाला आहे याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी, अशी विनंती आहे.

लेखनकाल
ता. १४-१०-१९४२

प्रसिद्धिकाळ
ता. १६-११-१९४२



# ( १५ )

# " श्रीसमर्थहृदय " वाचून आलेल्या कांहीं शंका

## — हप्ता पहिला —

( लेखक – रा. गणेश गोविंद फारसनीस, बी. ए., विजापूर )

" श्री समर्थहृदय " वाचून माझ्या मनांत कांहीं शंका उपस्थित झाल्या आहेत. त्या मासिकाच्या द्वारें ग्रंथकर्त्यांच्या व वाचकांच्या पुढें विचारार्थ ठेवीत आहे.

श्री ग्रंथराजाच्या लेखनाचा कालनिर्णय ठरवितांना पृष्ठ ३२२ वर म्हटलें आहे कीं, " अशेरीस, कोणी सांगावें, तंजावर मठपति भीमस्वामी यांनीं श्रीसमर्थांच्या निर्याणाच्या वर्णनांत ( श्री सांप्रदायिक विविध विषयांक २५ वा ) म्हटल्याप्रमाणें १६०३ च्या मार्गशीर्षपर्यंत, पहिले सहा दशक, नंतर सातवा दशक, नंतर आठवा ज्ञानदशक व नंतर, सांचलेले अनेक स्फुट समास एकत्र करून, त्यांत व एकवीससमासींतील आठवा समास सामील करून, त्यांची विव्हे लावून व दशक पाडून, नऊ ते वीस असे दशक जोडले व याप्रमाणें एकंदर वीस दशक दोनशें समासांचा ग्रंथराज दासबोध, श्रीसमर्थांनी महाराष्ट्राच्या हवालीं केला ! आणि नंतर दोन च महिन्यांनीं माघ वद्य ९ स + + + आपली वाङ्मयमूर्ति मागें ठेवून श्रीसमर्थांनी आपल्या स्थूल देहाचा त्याग केला ।। "

यांतील ग्रन्थराजाच्या कालनिर्णयासंबंधींचें भीमस्वामींचें विधान मान्य केल्यास कांहीं अडचणी संभवतात. त्यापैकीं

### पहिली शंका

प्रताप "कर गिरिधरांनीं, श्रीसमर्थ काय दिवसांनीं दर्शनास आलेल्या महंताची जी दासबोधाची परीक्षा घेत, त्या संबंधीं केलेल्या विधानाची. गिरिधर म्हणतात कीं —

महंत निस्पृह येती देशांतरींचे । समर्थ ग्रंथ मंचकीं घेती तयाचे ।
दशक समास व्यस्ताव्यस्त वाडूनि ग्रन्थाचे । होती महंताचे परीक्षक ।।९-९

सण्या ग्रंथ महंतें लिहे लाविला ।
तरी शुद्ध विवरणें पूर्ण परमार्थ केला ।
विलंबें ग्रन्थ लिहे लावित महंत बैसला ।
तरी ग्रन्थपूजन मात्र संपादिलें ॥ ७

तेव्हां शंका अशी कीं, भीमस्वामीमतें दासबोधाची व्यवस्थित मांडणी च जर श्रीसमर्थांच्या निर्याणापूर्वी अवघे दोन च महिने झाली होती, तर या दूरच्या किंवा जवळच्या महंतांच्या हातीं संपूर्ण दासबोध, पूर्ण व्यवस्थित स्थितींत मांडणी केला गेलेला थाला कोठून व त्याची परीक्षा तरी संभवते कशी ?

यावर असें उत्तर येण्याचा संभव आहे कीं, वीसदशकी दासबोध महंतांच्या हातीं नसेल, पण निदान आठदशकी तरी होता ना ! त्याची च परीक्षा श्री समर्थ घेत असावेत. उत्तर वरवर पाहिल्यास बिनतोड आहे. पण मग असें म्हणावेसें वाटतें कीं, या आठदशकी दासबोधाच्या परीक्षेंत कांहीं मौज नाहीं. वीसदशकीच्या परीक्षेंत जें स्वारस्य आहे, तें यांत नाहीं. हें आमचें म्हणणें ग्रन्थराजाच्या अभ्यासकांस खात्रीनें पटेल असें आम्हांस वाटतें.

## शंका दुसरी

श्री वेणाबाईंनीं श्रीसमर्थांस ग्रन्थराजाच्या सामर्थ्याविषयीं केलेल्या प्रश्नाबाबतची. श्रीसमर्थांचें उत्तर वाचकांस पूर्ण परिचित आहे:—

श्रीरामदेवार्चन सिद्ध चि आहे । श्रीग्रन्थराजदासबोधसामर्थ्य सिद्ध चि पाहे ।
जो जो महंत येथें निश्चयें राहे । तो तो आहे साक्षात्कार ॥ प्र. ९–३८

तसें च त्यांनीं पलंगावर उताणे पडून दासबोध वाचणाऱ्या महंताला शिकविलेल्या धड्यासंबंधीचा:—

समर्थग्रन्थ मंचकावरी कोणी येकें घेतला ।
महंत थोरपणें वाचित बैसला ।
अकस्मात वेणाबाईनें देखोनि साष्टांग नमस्कार घातला ।
समर्थ मंचकीं दासबोधरूपें लागोनियां ॥ १८–२०

या दोन हि ओव्यांतील " ग्रन्थराज दासबोध " वीस दशक दोनीसे समासी होता काय ? तो तसा होता असें मानल्यास प्रतापकारांचें हें म्हणणें भीमस्वामींच्या विरुद्ध जात नाहीं काय ? कारण श्रीवेणाबाईंनीं १६०० मध्यें परंधामीं वास केला. तेव्हां त्यांच्या वेळेस, भीमस्वामींच्या मताप्रमाणें, वीसदशकी दासबोध नसला पाहिजे, हें उघड आहे. आतां वेणाबाई आठदशकी दासबोधालाच ग्रन्थराज असें म्हणत असल्यास मग गोष्ट निराळी !

## शंका तिसरी

अशी की, कल्याणस्वामी श्रीसमर्थचरणांपासून त्यांच्या च आज्ञेवरून शके १६०० त च दूर झाले. डोमगांवची ग्रन्थराजाची त्यांच्या हातची प्रत, 'मूळप्रत' म्हणून मानण्यांत येते. आतां भीमस्वामींच्या म्हणण्याप्रमाणें वीसदशकी दासबोध श. १६०३ मध्यें पूर्ण करण्यांत आला. या वेळीं कल्याण सज्जनगडीं नव्हते च. याचा अर्थ असा की, दासबोध वीस दशक दोनीते समाप्त होण्याच्या वेळीं तें उपस्थित नव्हते, तेव्हां मग डोमगांवची दासबोधाची प्रत अस्सल — पहिली — असें कसें मानावें ! तसें च श्रीरामदासांची कविता, खंड १ ला, पृष्ठ २५ वर " कल्याण स्वामींनीं स्वहस्तानें लिहिलेली व श्रीसमर्थांनीं स्वतः शोधलेली दासबोधाची मूळ प्रत या च मठांत ( डोमगांव ) आहे " असें जें संपादकांनीं म्हटलें आहे, तें समर्थनीय कसें ! कल्याणस्वामी लेखकाचें काम करण्यास श्रीरानिध शेवटीं तीन वर्षे नव्हते च. मग त्यांनीं शेवटची प्रत केली कशी व केव्हां केली व ती श्रीसमर्थांकडे येऊन त्यांनीं त्यांत शोध स्वहस्तें घातले कसे ? याचा निर्णय व्हावयास पाहिजे.

असें वाटतें की, भीमस्वामींचें दासबोधाच्या रचनाकालसंबंधींचें म्हणणें बरोबर नसावें व संपादकांनीं दासबोधाच्या प्रस्तावनेंत पृष्ठ ९२ वर ( सहावी आवृत्ति ) " एकंदर दासबोध ग्रन्थ शके १५८१ या एका वर्षांत च लिहिला गेला असें अनुमान निघतें " असें जें म्हटलें आहे, तें च बरोबर असावेसें वाटतें. हा शक धरल्यास मग वर उत्पन्न झालेल्या शंका उरत नाहींत.

पण मग एक निराळी च शंका या पक्षीं उद्भवते. श्रीसमर्थहृदयाच्या पृ. १७ वर ग्रन्थकर्त्यांनीं श्रीसमर्थांच्या एकंदर ग्रन्थांच्या लेखनाचा कालानुक्रम कसा असावा, याचें अनुमान बांधलें आहे. " मला असें वाटतें, ओंव्या शतकें आधीं, मग पूर्वारंभादि ओंवीबद्ध प्रकरणें, मग एकवीस समासी दासबोध, मग सप्तदशकी दासबोध, नंतर रामायण, मनाचे श्लोक आणि शेवटीं सायन्त वीस दशकी श्रीमत् ग्रन्थराज दासबोध असा रचनेचा स्थूलमानानें कालानुक्रम असावा. " हें अनुमान गृहीत धरल्यास मनांत असा विचार येतो कीं, काय श्रीसमर्थांच्या हातून शके १५८१ ते १६०३ पर्यंतच्या बावीस वर्षांच्या कालावधींत केवळ कांहीं स्फुट ओंव्या, थोडीं करुणाष्टकें, किरकोळ पदपदांतरें इत्यादि स्फुटरचना च मधून मधून, प्रसंगानुसार वेळोवेळीं झाली असावी ? श्रीसमर्थांच्या ग्रन्थकर्तृत्वाच्या सागराला शके १५८१ नंतर काय एकदम ओहोटी लागली ? वयाच्या १४।१५ वर्षांपासून ज्यांनीं जगताला आपला स्फूर्तिसंदेश द्यावयाला प्रारंभ केला, तो त्यांनीं आयुष्याच्या अगदीं परिपक्व अवस्थेंत देण्याचा थांबवावा ? हें अगदीं च असंभवनीय व चमत्कारिक वाटतें व असें वाटतें कीं, भीमस्वामी च बरोबर असावेत. पण मग त्याविरुद्ध आलेल्या वरील शंकांची वाट कशी लावावयाची ?

## शंका चौथी

तीर्थाटनाच्या १२ वर्षांत श्रीसमर्थांनीं मौनव्रत धारण केलें होतें, त्याबद्दलची. श्रीसमर्थांनीं हें आपलें मौन कृष्णातीरास आल्यावर म्हणजे शके १५६६ च्या सुमारास " पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी " इ. पद प्रथम म्हणून सोडलें असें प्रतापकार सांगतात :—

समर्थवाणी प्रथम वदली । पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ।
येथूनि मौनमुद्रा देवें विसर्जन केली । जगदोद्धाराकारणें ॥ ३–२९

प्रतापकारांचें हें म्हणणें मान्य केल्यास श्रीसमर्थहृदय ग्रन्थाच्या पृष्ठ ११८ वर ग्रन्थकारांनीं जें एक विधान केलें आहे, त्याची संगति कशी लावावयाची ? " उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र हिंडतांना सर्व तऱ्हेच्या लोकांशीं त्यांचा ( श्रीसमर्थांचा ) संबंध येत असला पाहिजे, त्यांत मुसलमानांच्या गांठी पडत असल्या पाहिजेत. मिश्र समाजापुढें त्यांचीं कीर्तनें हि होत असलीं पाहिजेत " इ. तरी च पृष्ठ ५२१ वर " महाराष्ट्राबाहेर ते जेव्हां संचार करीत, विशेषतः उत्तर हिंदुस्थानांत जेव्हां ते जात, तेव्हां त्यांचीं कीर्तनें आणि प्रवचनें हिंदुस्थानी भाषेंत होत असावींत. ... ... ... कुराण हि त्यांच्या वाचण्यांत होतें व हिंदुमुसलमानांच्या मिश्र समाजापुढें बोलतांना ते कुराणाचा हि आधार सांगत. ... ... मुसलमान समाजापुढें हि उभे ठाकून कीर्तनद्वारा ते त्यांना बोध करीत. " तात्पर्य तीर्थाटनप्रसंगीं श्रीसमर्थ १२ वर्षें मौनी होते असें प्रतापकार म्हणतात व प्रतापाच्या प्रस्तावनेंत ग्रन्थकार त्याचा अनुवाद हि करतात, पण वरील उताऱ्यावरून ते मौनी नसावेत असें आपल्या च लिखाणाविरुद्ध व ' प्रताप ' काराविरुद्ध लिहितात, त्याची एकवाक्यता कशी करावयाची, असा प्रश्न विचारावासा वाटतो.

## शंका पांचवी

सभेनें श्रीसमर्थांचे समग्र ग्रन्थ ( लघु काव्यांव्यतिरिक्त ) कल्याणांच्या हस्तलिखित बाडावरून प्रकाशित केलेले आहेत. कल्याण श्रीसमर्थांचे लेखक होते, असें अनेक ठिकाणीं संपादकांनीं म्हटलेलें आहे. ( उदाहरणार्थ, दासबोध आवृत्ति ६ वी, द. २×३×२५ वरील टीप पहा ). शके १५६७ च्या सुमारास कल्याण श्रीसांप्रदायांत प्रविष्ट झाले. तेव्हां १५६७ पर्यंतच्या कालांत श्रीसमर्थांनीं जी ग्रंथरचना केली, तिचे लेखक कोण होते, असा प्रश्न उद्भवतो. श्लोकबद्ध प्रकरणांपैकीं " अष्टकांची रचना त्यांच्या ( श्रीसमर्थांच्या ) लहान वयापासून तों शेवटपर्यंत होत गेली असावी ... ... ... स्वतःचा कवि म्हणून ते उल्लेख करितात, तेव्हां ती रचना त्यांच्या अल्पवयांतील असावी, " अथवा " हीं प्रकरणें श्री समर्थांच्या अवतारकार्याच्या आरंभींच्या काळांतील असावींत, असें

वाटतें, " तरी च कर्णाटकांतील कांहीं अटकें यांच्या पूर्व वयांतील असावींत असें ' हृदय ' कारांनी म्हटलें आहे. तेव्हां १५६७ च्या पूर्वीच्या या सर्व कवितेचा लेखक कोण ? कल्याण तर नव्हत च. कारण ते सांप्रदायांत प्रविष्ट झाले मुळीं १५६७ त. मग " श्री समर्थांनीं सांगावें व कल्याणांनीं लिहावें " या समजाची वाट कशी लावावयाची ? पंचवटीच्या तपश्चर्येच्या काळांतील व पर्यटनप्रसंगांतील त्यांचा लेखक कोण ? कां ते स्वतः च लिहीत ? ते स्वतः लिहीत असावेत असें त्यांच्या वाल्मीकि रामायणावरून सिद्ध होत आहे. मग तीं वाडें गेलीं कोठें ? या वरून आपली एक सिद्ध होतें कीं, श्रीसमर्थ स्वतः हातानें कधीं च लिहीत नसावेत, असें जें केव्हां केव्हां लेखकांच्या लिहिण्यांत येत असतें, तें सर्वस्वीं खरें नसावें. या सर्व गोष्टींचा विचार व्हावयास नको काय ?

## शंका सहावी

गीतेच्या सिद्धान्तांत व श्रीसमर्थांच्या सिद्धान्तांत मोठा फरक असावा, असें श्रीसमर्थांच्या कांहीं उद्गारांवरून वाटतें, ही होय. गीता संसार करून मुद्दा सोडून निर्लेपपणानें बाहेर पडण्याची हातवटी व संदेश जगास अगदीं निःसंदिग्धपणें देत आहे. संसार अजीबात टाकून द्या, असें गीतामाउली चुकून सुद्धां कोठें हि सांगत नाहीं. श्रीसमर्थांची प्रपंच साधून परमार्थ करा असें सांगणारीं किती तरी वाक्यें आहेत. पण त्यांच्या जीवींचें गुज व इच्छा निराळी च आहे. प्रपंच सुटत च नाहीं म्हणून निरुपायानें ते कांहीं अटींवर तो करण्यास जगास सांगत आहेत. त्यांची खरीखुरी इच्छा संसार अथवा प्रपंच करूं नये अशी च आहे. या विधानास त्यांचे पुढील उद्गार साक्ष देत आहेतः—

अवघा दुःखमये संसार । तरी कां त्यजिते थोर थोर ।

एक. स. २० × ८

असा प्रश्न ते शिष्यास विचारून,

ऐसें विचारावें तुवां । ठाकेल तरी प्रपंच करावा ।
नाहीं तरी नेमस्त त्यजावा । हे चि आज्ञा पोटस्ते ॥

असें आपल्या अन्तःकरणींचें गुज त्याला बोलत आहेत. श्रीसमर्थांचें हें मत गीतेच्या विरुद्ध नाहीं काय ? तसें च ते लौकिकांत कसे हि वागले असले, तरी शेवटीं त्यांचें मत संन्यासपर ठरत नाहीं काय ?

अरे जयास परमार्थ व्हावा । तेणें प्रपंच हा त्यजावा ।
प्रपंचीं परमार्थ करावा । तो ठाकेना सर्वथा ॥ एक. स. १८ × १८

प्रपंच म्हणिजे उदास नागवणा । आणि परमार्थ म्हणिजे प्रपंच बुडवणा ।
परस्परें या दोघां जणा । सर्वथा न पडे ॥ एक. स. १८ × २१

हे उद्गार कर्मयोग सांगतात कीं संन्यास सांगतात ? दासबोधांत हि श्रीसमर्थ एके ठिकाणीं सर्वस्वीं कर्मत्यागपर – संन्यासपर च बोलत आहेत :—

सिद्धास आणी साधन । हा तो अवघाच अनुमान ।
मुक्तास आणी बंधन । आडळेना ॥ ६ – १० – १६

साधनें जें कांहीं साधावें । तें तो आपण चि स्वभावें ।
आतां साधकाच्या नावें । सून्याकार ॥ १७

कुशाळ पावला राजपदवी । आतां श्रमें कासया राखावीं ।
कुशाळपणाची उठाठेवी । कासया पाहिजे ॥ १८

तैसा अवघा वृत्तिभाव । नाना साधनांचा उपाय ।
साध्य जालिया कैंचा ठाय । साधनांसी ॥ १९

साधनें काये साधावें । नेमें काये फळ घ्यावें ।
आपण वस्तु भरंगळावें । कासयासी ॥ २०

या सर्व उताऱ्यांवरून गीतेच्या सिद्धान्तांत व श्री समर्थांच्या ध्येयांत फार मोठें अन्तर आहे, असें वाचकांस वाटत नाहीं काय ?

श्री लोकमान्यांनीं आपल्या 'रहस्यां' त (पृ. ४२४) "तुकारामबुवा जरी संसारी होते तरी त्यांचा कल थोडासा कर्मत्यागाकडे च होता. म्हणून उत्कट भक्ति आणि त्या बरोबर च आमरणान्त ईश्वरार्पणपूर्वक निष्काम कर्मे असें जें प्रवृत्तिपर भागवत धर्माचें लक्षण किंवा गीतेचा सिद्धान्त त्याचा पूर्ण खुलासा कोणास पाहिजे असल्यास तुकारामबोवांनी च शिवाजी महाराजांस ज्या 'सद्गुरूंस शरण' जाण्यास सांगितलें त्या श्रीरामदास स्वामींच्या ग्रन्थाकडे च त्यानें वळलें पाहिजे," असें म्हटलें आहे. रहस्यकारांच्या या विधानाचा वरील एकवीस समासी व दासबोध मांतील वचनांशीं सूज्ञांनीं मेळ घालावा व आपलें मत ठरवावें. तसें च हीं वरील श्रीसमर्थांची वचनें व श्रीतुकोबारायांचीं पुढील वचनें यांची तुलना करावी :—

(अ) प्रपंच परमार्थ संपादीन दोनी ।
एक हि निदानीं न घडे त्यासी ॥ ३१७० ॥ आर्यभूषण गाथा

( आ ) एक मन तुझ्या अवघ्या मांडवळा ।
याविता तें तुला येईल कैसें ॥ ५२८

व परमार्थांच्या शिकवणीच्या दृष्टीनें या दोघांत कांहीं अंतर आहे काय तें पहावें. या दोघांत भेद असो वा नसो, आम्हांस येवढें च सांगावयाचें आहे कीं, गीतेच्या सिद्धान्तांत व श्रीसमर्थांच्या सिद्धान्तांत मोठा फरक आहे. गीता संसार करून परमार्थ करण्यास सांगते, तर श्रीसमर्थांच्या मतांचें गुज संसार सोडण्यास सांगतें.

वरील येवढ्या ग्रंथ पुरेत. सवडीनें बाकीच्या हि पुढें मागें वाचकांसमोर ठेवण्यांत येतील.

लेखनकाळ
ता. २५-८-१९४२

प्रसिद्धिकाळ
ता. १६-११-१९४२



( १६ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# ' शक्तिपात ' म्हणजे काय ?

( लेखक- रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापूर )

१५ व्या दशकाच्या दहाव्या समासांत श्रीसमर्थांनीं याचें विवरण ओंव्या ७ ते १२ मध्यें केलें आहे. विवरणानें चंचळ निश्चळाचा निवाडा होतो, विवेकानें सात्विक विचार करीत गेल्यानें निवृत्तिपदीं भेटी होते, मग त्यापासून जीव कधीं हि च्युत होत नाहीं, त्या ठिकाणीं ज्ञानाचें विज्ञान होतें, मन उन्मन होतें, तत्वांचा झाडा झाल्यानंतर निर्गुणाशीं तादात्म्य होतें, मडिल असा जो अंतरात्मा त्याच्या शोधनानें चंचळाचें निश्चळ होतें व तेथें च देव व भक्त ही द्वैताची माया संपते, त्याठिकाण म्हणून कांहीं तेथें शिल्लक च उरत नाहीं, इत्यादि सांगून शेवटीं,

> अज्ञान शक्ति निरसली । ज्ञान शक्ति मावळली ।
> वृत्तिशून्यें कैसी जाली । स्थिती पाहा ॥ १५-१०-१२

अशी जी ज्ञानाज्ञानातीत वृत्तिशून्य स्थिति तिला श्रीसमर्थ,

> मुख्य शक्तिपात तो ऐसा । नाहीं चंचळाचा वळसा ।
> निर्वातीं निर्वात कैसा । निर्विकारी ॥

असें म्हणत आहेत.

श्रीसमर्थांनीं या ' शक्तिपाता ' च्या वर्णनास कोणत्या ग्रन्थाचा आधार घेतला आहे, हें कळण्यास मार्ग नाहीं. तरी पण त्यांनीं याला योगवासिष्ठाचा आधार घेतला असावा, असें भावार्थ रामायणावरून वाटतें. श्रीनाथांनीं त्या आधारें च या ' शक्तिपाता ' चें विवरण आपल्या रामायणांत केलेलें आहे. सर्वसामान्य माणसांस कळेल इतक्या सुलभ रीतीनें नाथांनीं तें सांगितलें आहे.

बालकाण्डाच्या ११ व्या अध्यायांत विश्वामित्रांच्या सांगण्यावरून वसिष्ठांनीं श्रीरामांस ब्रह्मविद्येचा उपदेश केला आहे, असा प्रसंग नाथांनीं वर्णिला आहे. गुरुवाक्याच्या योगानें श्रीरामांची विदेहावस्था कशी तात्काळ झाली, हें पहा :—

प्राण पांगुळला जेयींचा येथ । कंठ जाहला सद्गदित ।
इंद्रियें उपरमलीं समस्त । पाडिलें ताटस्थ चिद्रूपत्वें ॥ ८६
सर्वांगीं रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळीं ।
मोतियांची जाळी । पांघुरविली निजसरें ॥ ८७
निःशेष नाठवे मीतूंपण । खुंटली वाचा पडलें मौन ।
जीव शिवांचें पुसिलें भान । चित्त समाधान पावलें ॥ ८८

*शिष्याला वचनमात्रें समाधिसुख देण्याचें वसिष्ठांचें हें अचाट सामर्थ्य पाहून विश्वामित्र चावरटले व त्यांस म्हणतातः—*

तुझ्या गुरुत्वाचें वर्म । मिथ्या देहादि इंद्रिय कर्म ।
शिष्य होय पूर्ण ब्रह्म । ते समाधि परम श्रीरामीं ॥ ९९३
शक्तिपातें शिष्योत्तमा । पावविलें न करितां श्रमा ।
हे तुझ्या गुरुत्वाची गरिमा । अगाध महिमा तिहीं लोकीं ॥ ९९४

*शिष्याचा शक्तिपात करून त्यास विनाश्रम समाधिसुख तुम्ही दिलें, तेव्हां धन्य आहे तुमची असें म्हणून ' शक्तिपात ' म्हणजे काय तें पुढल्या ओव्यांत सांगत आहेत :*

शिष्याच्या सकळ वृत्ति । वचनें लाविसी ब्रह्मस्थिति ।
शिष्य पावे ब्रह्मस्थिति । शक्तिपात निश्चितीं या नांव ॥ ९५
लव निमिष घटिका मुहूर्त । शिष्यासी वाणली हे स्थिती ।
शक्तिपातु हा निश्चितीं । ऐसी ख्याति गुरुवाक्यें ॥ ९६

*सद्गुरूंनीं आपल्या वचनसामर्थ्यानें शिष्याच्या सर्व वृत्ति ब्रह्मस्थितीमध्यें केंद्रित करणें म्हणजे ' शक्तिपात ' होय असा वरील ओव्यांचा सारांश आहे.*

लेखनकाळ — ता. २२-१०-१९४२

प्रसिद्धिकाळ — ता. १६-११-१९४२

॥ श्रीरामसमर्थ ॥

# पंचरत्नस्तोत्र

( लेखक – प्रो. श्रीधर स्वामी महाराज, श्रीपरमानंद मठ,
शिगेहळ्ळी, जि. धारवार )

॥ श्रीरामसमर्थ ॥

आदर्शान्तरबिंबितं खलु यथा दृश्यं मृषैव स्फुटम् ।
तद्वद्विश्वमिदं विभाति सकलं यस्मिन्परे वस्तुनि ॥
चित्सामान्यसदेकतो न खलु वै यस्मिन्विकारः क्वचित् ।
तं वंदे गुरुरामदासममलं सच्चित्स्वरूपं शिवम् ॥ १ ॥

बीजस्यान्तरवर्ति वृक्षसदृशं विश्वं यदेतत्खलु ।
यस्यां सूक्ष्मतयाऽवतिष्ठति पुरा माया परा सा मृषा ॥
यत्सान्निध्यवशात्करोति विविधं विश्वं स्फुटं स्वेच्छया ।
तं वंदे गुरुरामदासममलं सच्चित्स्वरूपं शिवम् ॥ २ ॥

रज्ज्वां सर्पविभासवत्खलु मृषा माया च यस्मिन्परे ।
ब्रह्माहं निजमूलमन्वयति या विद्यास्वरूपेण वै ॥
जीवोऽहं च विभासयत्यपि पुनः स्वाऽविद्यया चेष्टितम् ।
तं वंदे गुरुरामदासममलं सच्चित्स्वरूपं शिवम् ॥ ३ ॥

सृष्ट्वा सर्वमिदं जगच्च विविधं जीवेश यंथादिकान् ।
सा यस्मिन् खलु भाति सूर्यकिरणे माया मृगांभो यथा ॥
यत्स्मृत्या च पुनः स्वचेष्टितमिदं स्वप्नवत्र न भासत्यहो ।
तं वंदे गुरुरामदासममलं सच्चित्स्वरूपं शिवम् ॥ ४ ॥

अंतर्बाह्यतयाऽवतिष्ठति सदा यत्स्वात्मरूपं शिवम् ।
मायाकल्पितदेशकालकलना यस्मिन्न चित्रीकृतम् ॥
अद्वैतामृतसौख्यसिंधुमगमद्वीर्यस्य बोधात्परम् ।
तं वंदे गुरुरामदासममलं सच्चित्स्वरूपं शिवम् ॥ ५ ॥

पंचरत्नात्मकमिदं स्तोत्रं पावनमुत्तमम् ।
यः पठेच्छृणुयाद्वापि तस्य मुक्तिः करे स्थिता ॥ ६ ॥

| लेखनकाल | प्रसिद्धिकाल |
|---|---|
| दि. २९।१०।१९४२ | दि. १६-१२-१९४२ |



॥ श्रीरामसमर्थ ॥

# अभयदान

( लेखक – श्री. श्रीधर स्वामी महाराज, श्रीपरमानंद मठ, शिगेहळ्ळी )

॥ श्रीरामसमर्थ ॥

( १ )

यं मत्वा मुनयश्चिरेप्सितपदं गच्छन्ति निर्विघ्नतः ।
यो वै सर्वगणाधिपः प्रभुरिति ख्यातः स्वयं निर्गुणः ॥
तद्ब्रह्मैव सनातनं त्रिभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ १ ॥

ज्याला नमस्कार करून फार दिवसांपासून इच्छिलेल्या परमपदाप्रत मुनी निर्विघ्नतेनें पोहोंचतात, जो सगुणरूपानें सर्व मायीक कार्य – समुदायाचा शास्ता आणि मायेचा महेश्वर असून हि स्वभावतः जो निर्गुण म्हणूनच प्रसिद्ध आहे, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( २ )

विद्यादया परमेश्वरी भवति या मुख्या च भूमातये ।
ब्रह्मैक्यं निजमूलमन्वयति यच्छिष्टं पदं प्राणिनाम् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं त्रिभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ २ ॥

ज्या आत्यंतिक भूमासुखाच्या प्राप्तीकरितां विचारुपी परमेश्वरी अत्यावश्यक आहे व हिच्यामुळें जें 'नेति नेति' म्हणून सर्व कार्यजाताच्या निराकरणानें शेवटीं उरणारें सच्चिन्मयरूपी निजसुख प्राणीमात्राला प्राप्त होतें तें सनातन विभुरूप ब्रह्मच मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( ३ )

नाम्ना श्रीधर चिन्मयो धरति यो नित्यं च मोक्षश्रियम् ।
जीवानां तरणाय सद्गुरुरिति ख्यातः स्वयं शाश्वतः ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ ३ ॥

नित्य मोक्षश्री धारण करणारा म्हणून ज्या चिन्मात्राला श्रीधर हें नांव प्राप्त झालें, जो स्वतः शाश्वत म्हणजे सदाचाच निर्विकार असून जीवांच्या उद्धारकरितां म्हणून जो सद्गुरु या नांवानें प्रसिद्ध झाला, तें सनातन विभुरूप ब्रह्मच मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें, व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( ४ )

यत्प्राप्तं सनकादिभिर्मुनिवरैः प्राप्तं शुकेनापि यत् ।
यन्नित्यं ह्युररीकृतं च खलु वै ब्रह्मादिभिर्दैवतैः ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ ४ ॥

जें सनकादि मुनिश्रेष्ठांनीं मिळविलें, श्री शुकानें हि जें आत्मसात केलें, ब्रह्मादि सर्व देवश्रेष्ठ हि जें अगदीं उराशीं बाळगून असतात, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

(५)

ॐ कारं व्यभजच्छ्रुतिर्बहुविधा ब्रूते चतुर्धाष्टता ।
तुर्यं शुद्धमिति स्फुटं च परमं श्रीराममद्रश्च यत् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्माभयं वै यतः ॥ ५ ॥

श्रुतीनें ॐ काराचे चार, आठ इत्यादि बहुविध प्रकारानें, विभाग पाडून, शेवटचें जें श्रेष्ठ शुद्ध स्वरूप श्रीराममद्र म्हणून स्पष्ट केलें, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

(६)

न स्त्री नैव पुमानकाय इति यो ह्यात्मा च सर्वांतरः ।
गोत्रं तस्य न वर्णमस्ति न तथा लिंगं न वा ह्याश्रमः ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्माभयं वै यतः ॥ ६ ॥

जें सर्वांतर आत्मस्वरूप अशरीर असल्यामुळें स्त्री हि नव्हे व पुरुष हि पण नव्हे, ज्याला गोत्र, जाति, लिंगभेद, आश्रम इत्यादि कुठीं च नाहींत, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें, व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

(७)

सर्वात्मा श्रुतिरप्यहो वदति यज्ज्ञात्वा न शोकं पुनः ।
सर्वोपाधिविवर्जितं भवति यच्छांतं पदं निर्गुणम् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्माभयं वै यतः ॥ ७ ॥

ज्याला सर्वात्मा म्हणून श्रुति सांगते, व ज्याचें ज्ञान झालें असतां पुन्हां शोक होत नाहीं म्हणून म्हणते, सर्वोपाधिविवर्जित असून जें नितांत शांत व निर्गुणरूप आहे, तें सनातन विभुरूप ब्रह्माच मी असें निश्चयानें मला समजून आलें

असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( ८ )

भेदाभेदविभेदशून्यमिति यन्नास्ति द्वयं यस्य वै ।
सूक्ष्मात्सूक्ष्मतरं ह्यणुर्न महतो यद्वै महद्भिश्रुतम् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ ८ ॥

ज्याला वेगळें असें कांहींच नसल्यामुळें जें द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत या भावनेनें रहित आहे, जें सूक्ष्माहून अती सूक्ष्म असूनहि पण अणु होत नाहीं, जें 'महतो महीयान्' म्हणून प्रसिद्ध आहे, तें सनातन विभुरूप ब्रह्मच मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( ९ )

अज्ञानेन विभाति दुःखमिति तन्नाशाय भोगभ्रमः ।
आनंदोऽसि न भोगकर्म तव भो वाक्यैर्महद्भिः स्फुटम् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातंच यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ ९ ॥

अज्ञानानें वासना उत्पन्न होऊन ती असह्य झाली असतां होणारें तें दुःख त्या विषयाच्या भोगानें तरी नाहींसें होईल म्हणून विषयोपभोगाचा भ्रम उत्पन्न होतो. बाबा, तूं च आनंदरूप आहेस, तुला हें भोगकर्म नाहीं, इत्यादि महावाक्यांनीं जागें झालें असतां जें आपण आहों म्हणून प्राणिमात्राला वाटतें, तें सनातन विभुरूप ब्रह्मच मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश-अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( १० )

पक्षीवापि पशुः पिशाच गण गंधर्वाश्च देवा अपि ।
आब्रह्मादि पिपीलिकान्त नृषु नो नारिषु भेदः क्वचित् ॥

तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ १० ॥

पशु, पक्षी, पिशाच, गण, गंधर्व, देवांतून हि इतकें च नव्हे तर आब्रह्मादि पिपीलिकान्त सर्व प्राणिमात्रांतून व अभ्यस्त अशा स्त्रीपुरुषभेदांतून हि ज्यामुळें भेद म्हणून कोठें हि उरत नाहीं, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( ११ )

भीरस्तु द्वितयात्र सा खलु वसेज्ज्ञानैकमात्रे शिवे ।
स्वानंदे विततेऽद्वये सुविमले सर्वात्मकेऽरूपतः ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ ११ ॥

भिन्नतेनें भीति उत्पन्न होत असल्यास पुष्कळ होवो ! ज्या अद्वितीय, सुविमल, सर्वात्मक, ज्ञानैकमात्र, परमकल्याणरूप अशा स्वानंदाचे ठिकाणीं त्याच्या अरूपत्वामुळें ती भीति कधीं हि उत्पन्न होणें शक्य नाहीं, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

( १२ )

यत्पूर्वे सकलस्य भिन्नमपि नो यस्मिन्विकारः क्वचित् ।
माया नास्ति न चैश जीवकलनाऽविद्या न यस्मिन्निपत् ॥
तद्ब्रह्मैव सनातनं विभुरहं ज्ञातं च यस्मादतः ।
सर्वेभ्योऽप्यभयं तनोमि कुशलं ब्रह्मामयं वै यतः ॥ १२ ॥

जें सर्वाद्य, ज्या ठिकाणीं भिन्नत्व आणि विकार कोठें हि पण आढळत नाहींत, व चंचल अशी माया, अविद्या, व जीवेशकलना म्हणून हि कांहीं ज्यांत मुळीं च नाहीं, तें सनातन विभुरूप ब्रह्म च मी असें निश्चयानें मला समजून आलें असल्यामुळें, व मदभिन्न असणारें तें ब्रह्म अभयरूप असल्यामुळें, निरतिशय कल्याणरूप असें निरंकुश अभय हा मी सर्व प्राणिमात्रांना देत आहे.

## ( १९ )

# जगज्जोती

( लेखक-रा. गोपाळ रावजी गोगटे, बी. ए. एल्एल्. बी., भुसावळ )

आवघ्या जगास वांचविती । म्हणोनि नामें जगज्जोती । १०-९-१८

श्रीसमर्थांचे वाङ्मयांत असे कांहीं शब्द आढळतात, की, त्यांचेवर समर्थांच्या, जणूं काय, व्यक्तित्वाचा ठसा च बसला आहे. अशा शब्दांचा, त्यांच्या ग्रंथाधारें, अर्थ नीट समजून घेतल्याशिवाय, त्यांच्या म्हणण्याचा आशय, बरोबर लक्षांत येत नाहीं. जगज्जोती हा अशांपैकीं च एक शब्द आहे.

दासबोधांत, हा शब्द, प्रथम दहाव्या दशकांत भेटतो, व त्यानंतर पुढील दशकांत १५।१६ वेळां आलेला आहे. तसें च पंचीकर्ण योग, पंचमान, स्फुट प्रकरणें, व रामसमासी या समर्थांच्या इतर काव्यांत हि तो अनेक वेळां आलेला आहे. या सामग्रीच्या आधारें, व इतर ग्रंथांच्या आधारें, या शब्दाचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करूं.

या सामासिक शब्दांत, ' जगत् ' व ' ज्योतिस् ' अगर ' ज्योतिः ' असे दोन शब्द आहेत व संधिनियमाप्रमाणें ' जगज्ज्योतिः ' असें त्याचें शुद्ध रूप बनतें. पण समर्थग्रंथांत, लेखकानें तीन प्रकारें तो शब्द लिहिलेला आढळतो. ( १ ) ' जगज्जोती, ' १०-३-११ व १३; १०-५-२६; ( २ ) ' जगजोती ' स्फुटप्रकरणें ६७।४१; ( ३ ) ' जगजोती ' रामसमासी १-१६,१८; याप्रमाणें तो लिहिला गेला असला तरी, ' जगज्ज्योती ' असा च समर्थांचा शब्द असला पाहिजे, हें उघड आहे. ' प्रथल ' वा ' प्रेल ' लिहिण्याची, जशी धाटणी पडली, व ती जशी आतां सर्वांनीं कबूल केली, तशी च गत, या जगज्जोती शब्दाची झाली, असें मानलें तरी हि कांहीं बिघडत नाहीं.

## सप्तसमासींतील पहिला समास म्हणजे जगज्जोतीवर समर्थांचें एक सुंदर प्रवचन च होय.

गीता उपनिषदादि ग्रंथांचे आधारें, समर्थांनी, हा विषय सप्तसमासींत उत्तम रीतीनें, गुरुशिष्यसंवादरूपानें, समजून सांगितला आहे. हें सप्तसमासी प्रकरण, शके १८६१ मध्यें, स्फुटग्रंथांतून, सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध करी पर्यंत, अज्ञात होतें. पण ती अडचण दूर झाल्यामुळें, आपणांस समर्थांचा आशय समजण्यास, आयती च संधी मिळाली आहे, व त्याचा पूर्ण फायदा करून घेणें आपलें कर्तव्य आहे.

### श्रोतयाचा प्रश्न

ब्रह्म स्वयंप्रकाश आहे, असें ज्याला ऐकून ठाऊक झालें आहे, असा कोणी एक श्रोता, आपणांस माहित असलेले प्रकाशाचे जिन्नस, म्हणजे सूर्य, चंद्र, नक्षत्रें, वन्हि, दीप, वीज, रत्नें वगैरेंचीं नांवें घेऊन, प्रश्न विचारतो कीः—

उदंड प्रकाश दिसतो ऐसा । त्यांत ब्रह्माचा प्रकाश कैसा । १-८

प्रकाश अथवा ज्योति, हा शब्द, तेज या अर्थी रूढ आहे, व अध्यात्माचे प्रांतांत आत्मप्रकाश असा त्याचा अर्थ आहे. श्रोत्यानें प्रकाशाचे म्हणून सांगितलेले सर्व पदार्थ, चक्षुरादि बहिर्मुख इंद्रियांना, बाहेरून उजेड पुरवून व्यवहारास साह्यभूत होणारे आहेत; व आत्मप्रकाश या सर्वांहून अगदीं निराळ्या प्रकारचा आहे. आदित्यादि बाह्य प्रकाशाप्रमाणें अवभासक, पण स्वतः दुसऱ्या ज्योतीकडून प्रकाशित न होणारा, चक्षुरादि इंद्रियांस न दिसणारा अंतःस्थ, असा आहे हें समजून सांगण्याकरितां श्रोत्याकडून हा प्रश्न पुढें आणलेला आहे. 'ज्योतिश्चरणाभिधानात्' ( ब्रह्मसूत्र १।१।२४ ) यांत हि 'ज्योति' या शब्दानें 'आदित्यादि ज्योतिरभिधीयते किंवा परमात्मेति' असा वादाकडून वरील श्रोत्याप्रमाणें च पूर्वपक्ष मांडला गेला आहे. थोडक्यांत, ज्योती शब्दाचा अर्थ समजून देण्याकरतां, ही प्रस्तावना च समर्थांनी केली आहे असें वाटतें.

### जनकयाज्ञवल्क्यसंवाद

ज्योती कोणती, या संबंधानें जनक व याज्ञवल्क्य यांचे मध्यें, प्रश्नोत्तरें काय झालीं, तें बृहदारण्यक अध्याय ४ ब्राह्मण ३ यांत सांगितलें आहे, त्याचा सारांश असाः—

जनकाचा प्रश्न— 'किं ज्योतिरयं पुरुषः' म्हणजे ज्या प्रकाशाच्या आधारावर मनुष्य प्राण्याचे व्यवहार चालतात तो प्रकाश कोणता ?

याज्ञवल्क्याचें उत्तर— 'आदित्य ज्योतिः' — सूर्यप्रकाश

जनकप्रश्न— सूर्य अस्तास गेल्यावर मग कोणता प्रकाश ?

उत्तर— चंद्रप्रकाश

प्रश्न— सूर्य व चंद्र दोन्ही अस्तमित झाल्यावर ?

उत्तर-- अग्निप्रकाश

प्रश्न-- सूर्य, चंद्र, अग्नि हे नसले तर ?

उत्तर-- वाणीचा प्रकाश ( रात्रीं गुडुप अंधार असतांना, कुत्र्याच्या भुंकण्यावरून, मनुष्य गांवाची वाट काढतो, तेव्हां कुत्र्याची वाणी प्रकाशा-सारखी च झाली )

प्रश्न--सूर्य, चंद्र, अग्नि, वाणी, यापैकीं कोणतें च नसेल तर ?

उत्तर-- 'आत्मैवास्य ज्योतिः '--आत्म्याच्या प्रकाशानें तो व्यवहार करतो.

प्रश्न-- ' कतम आत्मा ' -- आत्मा कोणता ?

उत्तर-- ' योऽयं विज्ञानमयः प्राणेषु हृद्यन्तर्ज्योतिः पुरुषः " -- जो हा प्राणामध्यें, विज्ञानमय, बुद्धीच्या अंतर्भागीं, ज्योतीरूप पुरुष आहे ( तो च आत्मा होय ).

या प्रश्नोत्तरांत, बाह्य प्रकाश देणाऱ्या ज्या वस्तू सांगितल्या गेल्या आहेत, त्या व तसल्या च आणखी अनेक वस्तू, शिष्याच्या वरील प्रश्नांत सांगितल्या गेल्या आहेत, हें पाहिलें म्हणजे, हा संवाद समर्थांच्या मनासमोर, त्यावेळीं होता असें म्हणण्यांत चूक होणार नाहीं.

जनकयाज्ञवल्क्यसंवादाची ही पद्धत अशी आहे कीं, यांत एक पक्ष, सरकत सरकत इष्ट ठिकाणीं येऊन पोचतो. प्रो. रा. द. रानडे या पद्धतीला आपल्या " Constructive Survey of Upanishad Philosophy " या ग्रंथांत Regression method असें म्हणतात.

## ' प्रकाश ' शब्दाचा खरा अर्थ

प्रकाश या शब्दाचे, उजेड व ज्ञान, असे दोन अर्थ, म्हणजे बाह्य प्रकाश व अंतर्प्रकाश, असे दोन्ही प्रकाश त्यांत सामावत असतां, शिष्यानें बाह्य प्रकाश एवढा च त्याचा अर्थ ग्रहण केला आहे हें जाणून, या दोहोंतील फरक स्पष्ट करून, ' स्वयंप्रकाश ब्रह्म ' यांत प्रकाशाचा अर्थ काय समजावयाचा, हें समर्थांनीं समजून सांगितलें आहे, त्याची मांडणी खालीलप्रमाणें होते :



| | |
|---|---|
| ( ३ ) अंधार नाहींसा करतो | ( ३ ) अज्ञान नाहींसें करतो |
| ( ४ ) दृष्टीस दिसतो | ( ४ ) मनास भासतो |
| ( ५ ) टोंवळें पाहाणारा | ( ५ ) सूक्ष्म ओळखणारा |
| ( ६ ) वायूनें जातो | ( ६ ) वायूनें तगतो |

या प्रमाणें दोन्ही प्रकाशांतील भेद दाखवून, एक ठोकळ लक्षण सांगतात कीं,

अंतरीं जें जें कळत जातें । त्यास प्रकाश ऐसें म्हणिजेतें ।
उजेडासारिखें वाटतें । परि तें नव्हे ॥ १-१२

### थोल्याच्या प्रश्नास उत्तर

याचें ऐसें प्रतिवचन । वक्ता म्हणे सावधान ।
ब्रह्म जें कां सनातन । तेथें प्रकाश नाहीं ॥ १-९

समर्थ या ओवीनें असें सांगत आहेत कीं, हे शिष्या, तूं जे सूर्यचंद्रादि प्रकाशाचे जिन्नस सांगितलेस, ते सुद्धां ब्रह्माच्या प्रकाशानें प्रकाशित होणारे आहेत, तर ते ब्रह्माला प्रकाशित करूं शकतील हें शक्य नाहीं. हें समर्थांचें सांगणें

( १ ) न तत्र सूर्यो भाति न चन्द्र तारकं। नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।
तमेव भान्तमनुभाति सर्वं । तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥

हा जो मुंडक २।२।११, कठ ५।१५, श्वेता० ६।१४ अशा तीन उपनिषदांत, एकसारखा च प्रसिद्ध मंत्र आढळतो, त्याला धरून आहे.

मंत्राचा अर्थ— त्या ( ब्रह्मतत्वाच्या ) ठिकाणीं सूर्य, चंद्र, तारका प्रकाश पाडूं शकत नाहींत; ह्या विजा हि प्रकाश पाडूं शकत नाहींत; मग हा अग्नि कोठून प्रकाश पाडणार ? त्या स्वयंप्रकाश ब्रह्मतत्वाच्या तेजानें च, हें सर्व प्रकाशित होतें, आणि त्याच्या प्रकाशामुळें हें सर्व विश्व दृग्गोचर होतें. तसें च,

( २ ) न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः । गीता १५।६

( ३ ) येन सूर्यस्तपति तेजसेद्धः । तै. ब्रा. ३।१२।९।७

( ४ ) यद्भासा भासतेऽर्कादि भास्यैर्यत्तु न भास्यते ।
येन सर्वमिदं भाति तद्ब्रह्मेत्यवधारयेत् ॥ *आचार्यांचा आत्मबोध, श्लो. ६०*

( ५ ) ज्योतिषामपि तज्ज्योतिः । गीता १३।१७

या गीतादि वचनांतून हि, सूर्यादि हे भास्य अथवा प्रकाश्य आहेत व त्यांचे प्रकाशक ब्रह्म आहे, असें च मनोहर विवरिलें आहे.

बहुगुणी अंतरात्मा । अवघा त्याचा प्रकाश महिमा ।
तया प्रकाशास उपमा । दुसरी नाहीं ॥ १-१०

सप्तसमासींतील १-९ या ओवीनें, सनातन ब्रह्माचे ठिकाणीं सूर्यादींचा प्रकाश नाहीं, हें सांगून झाल्यावर, मुख्य प्रकाशमहिमा कोणाचा आहे, हें सांगितलें आहे. अंतरात्मा, हा हि एक, समर्थांचाच शब्द आहे. त्याच्या अर्थाचा ऊहापोह 'श्रीसमर्थहृदय', या समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांनीं लिहिलेल्या नवीन ग्रंथांत पृष्ठ ४४१ ते ४४८ यथास्थित केला आहे. तो बहुगुणी कसा हें दासबोधामध्यें १०।१०।३५ ते ४२ यांत कोणास हि पाहतां येईल.

श्रोत्रीं बैसोन शब्द ऐकतो । घ्राणेंद्रियें वास घेतो ।
त्वचेइंद्रियें जाणतो । सीतोष्णादिक ॥ १०-१०-४१

सकळांमधें परी निराळा । ४२

तो चाळवी सकळ देहासी । करून अकर्ता म्हणती त्यासी ।
तो क्षेत्रज्ञ क्षेत्रवासी । देही कूटस्थ बोलिजे ॥ ४४

या दासबोधांतील अंतरात्म्याच्या ओव्या व

नेत्रीं भरोन आत्मअंश । सकळ पाहे ॥ १-१७

पदार्थ दृष्टीनें पाहाणें । आत्मयाचीं अखंड लक्षणें ।
ज्ञानेंद्रियें करूनि पाहाणें । सकळ कांहीं ॥ २०

आत्मा दृष्टीनें पाहातो । आत्मा श्रवणें लक्षीतो ।
ज्ञानेंद्रियें बैसतो । पाहावया ॥ २२

या सप्तसमासींतील अंतर्प्रकाशाच्या ओव्या ताडून पाहिल्या म्हणजे "बहुगुणी अंतरात्मा । अवघा त्याचा प्रकाश महिमा" कसा हें यथेष्ट पटतें.

तया प्रकाशास उपमा । दुसरी नाहीं ॥ १-१०
ऐसा प्रकाश दुसरा कैचा । माहा श्रेष्ट ॥ ११

हें समर्थांचें म्हणणें हेतुगर्भ आहे. कसें तें पाहूं.

बृहदारण्यकाच्या तिसऱ्या अध्यायाच्या सातव्या ब्राह्मणांत, अन्तर्यामीबद्दल—म्हणजे समर्थांच्या अंतरात्म्याबद्दल—विस्तृत विवेचन आहे. उद्दालकानें याज्ञवल्क्यांना विचारल्यावरून, १९।२० मंत्रांनीं, त्यांनीं उत्तर दिलें आहे. सर्व मंत्रांची धाटणी एकसारखीच आहे. उदाहरणार्थ एक मंत्र उतारतों—

य आदित्ये तिष्ठन्नादित्यादन्तरो यमादित्यो न वेद यस्यादित्यः
शरीरं य आदित्यमन्तरो यमयत्येष त आत्माऽन्तर्याम्यमृतः ॥ ९

या मंत्राचा अर्थ खालीं सर्वत्र मंत्रांचा मिळून सारांश दिला आहे त्यावरून समजेल.

हा अन्तर्यामी, पृथ्वी, आप, अन्तरिक्ष, वायु, द्युलोक, आदित्य, दिशा, चंद्रतारका, आकाश, तम, तेज, प्राण, वाक्, चक्षु, श्रोत्र, मन, त्वचा, बुद्धि, इत्यादि सर्वांत राहात असून, त्या सर्वांहून तो स्वतंत्र आहे. तो सर्वांचें धारण पोषण करतो, त्यांवर सत्ता चालवितो. तो प्रत्येकाचा आत्मा—अन्तर्यामी आहे. तो अमृत अविनाशी प्रज्ञस्वरूप आहे. याप्रमाणें उद्दालकाला सांगून, शेवटीं समारोप केला आहे कीं—

एष त अन्तर्याम्यमृतोऽदृष्टोद्रष्टा, अश्रुतःश्रोता, अमतोमन्ता
अविज्ञातो विज्ञाता नान्योऽतोऽस्ति द्रष्टा श्रोता मन्ता विज्ञाता ।

*हा प्रज्ञस्वरूप अन्तर्यामी स्वतः अदृश्य असून सर्वदर्शी आहे, ऐकूं येण्यासारखा नसून ऐकणारा आहे, दुसऱ्याकडून विचार केला जात नसून, ऐकणारा आहे,* अविज्ञात असून सर्वांस जाणणारा आहे. याच्यावांचून दुसरा द्रष्टा, श्रोता, मन्ता, विज्ञाता कोणी नाहीं. हें या अन्तर्यामीचें, अथवा जगज्जोतीचें, अथवा अन्तरात्म्याचें, महत्व लक्षांत घेऊन च, समर्थ

ऐसा पदार्थ दुसरा कैचा । माहा श्रेष्ट ॥ १–१७

असें सांगत आहेत.

येथपर्यंतच्या विवेचनावरून, असें स्पष्ट झालें कीं, प्रज्ञतत्वाच्या प्रांतांत, प्रकाशाचा अर्थ, अंतःस्थ आत्मप्रकाश असा च होतो, व तो प्रकाश, उजेड देणाऱ्या जिनसांपेक्षां फार श्रेष्ठ आहे. त्या प्रकाशाच्या आधारावर च, इंद्रियांमार्फत सर्व प्राण्यांचे व्यवहार चालतात. हें च आतां समर्थ एका दृष्टांतानें समजून सांगत आहेत.

## पर्वताच्या गुहेंतील प्रकाश

प्राण्यांचे, ज्ञानेंद्रियांमार्फत, विषयग्रहणाचे व्यवहार, बुद्धिस्थ चिदाभासाचे आधारें, कसे चालतात हें

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ *गीता* १५।९

यावरून सर्वांस समजण्यासारखें आहे. वरील श्लोकांतील ' अयं ' म्हणजे ( *गीता* १५।७ ) ' ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ' असा जीव अन्तर्यामी आहे, हें हि उघड आहे. तेव्हां प्राणिमात्रांचे अनेकविध व्यवहार कसे व कोणाच्या

आधारावर ह्या जगात घडत असतात, त्यांची प्रक्रिया काय आहे, याचा ऊहापोह करण्याची अवश्यकता वाटत नाहीं. असो. हे व्यवहार, अंतरात्म्याच्या प्रकाशावर अथवा जगज्जोतीच्या आधारें च घडूं शकतात, एरव्हीं घडणें शक्य नाहीं, हें समजून सांगण्यासाठीं समर्थ दृष्टांत देतात.

पर्वत कोरून स्थळ काढिलें । तेथें नाना प्रकाश ठेविलें ।
आणि द्वार योटून घेतलें । मग बाहेरी प्रकाश कैचा ॥ १-२७

जिला फक्त एक च दार आहे व एरव्हीं सगळीकडून जी बंदिस्त आहे, अशी एक पर्वताची गुहा केली व त्यांत प्रकाश देणारे, नाना प्रकारचे दिवे, मशाली, चुड्या, वगैरे, जिन्नस ठेवले, व दार घट्ट लावून घेतलें, तर काय होईल? अर्थात्, यत्किंचित्‌हि प्रकाश बाहेर दिसणार नाहीं. पण असें समजा कीं, जेथें "नाना प्रकाश ठेवले" होते, ते सर्व प्रकाशाचे जिन्नस, काढून "तेथें जरी ठेविलें पुरुषा," म्हणजे ज्याचीं सर्व ज्ञानेंद्रियें शाबूत आहेत, व ज्याच्या (पुरी शेते इति पुरुषः) शरीरांत, अंतर्यामी आहे, अशा एखाद्याला तेथें ठेवलें व दार लावून घेतलें, तर काय चमत्कार होतो पहा. त्या गुहेंत, जिनसेचा कोणता हि प्रकाश नसतांना, आत्म्याचा प्रकाश जणूं दाही द्वारांनीं बाहेर पडून, त्याला ज्ञान होईल. त्या गुहेंतील खालची माती गार आहे, हें स्पर्शज्ञानानें त्यास समजेल. गुहेंत पुष्पांचा घुवास असल्यास तो ओळखील, तेथें एखादें फळ असल्यास तें आंबट गोड तो ओळखील, या प्रमाणें त्याला ज्ञानाचा प्रकाश, पूर्ण अंधकारांत हि, होईल. इतकें च नव्हे, बाहेर पाऊस पडलेला त्याला समजेल, पुष्पांचा वाऱ्यावर वास येईल, तो त्याला आनंद देईल. बाहेर बर्फ पडूं लागलें तर, गुहेंतील गारव्यावरून, त्याला तें कळेल. फार काय त्याचें मन, दशदिशा फिरून नाटक सिनेमा हि पाहून येईल, स्वप्न हि तो पाहील. या दृष्टांतानें उजेड असून अंधार व अंधार असून प्रकाश कसा होतो हें सुंदर रीतीनें दाखविलें आहे. त्या गुहेंत पुरुष ठेवल्यामुळें असा परिणाम झाला कीं, कपाटबंद अशा त्या गुहेस, ज्ञानप्रकाश ज्यांतून बाहेर जाईल, अशीं अनेक द्वारें ठेवल्यासारखी, ती गुहा झाली.

अशा च आशयाचा, श्रीशंकराचार्यांच्या दक्षिणामूर्तिस्तोत्रांत एक श्लोक आहे, तो असा :

नानाछिद्र घटोदरस्थित महादीपप्रभाभास्वरं ।
ज्ञानं यस्य तु चक्षुरादिकरणद्वारा बहिः स्पंदते ।
जानामीति तमेव भांतमनुभात्येतत्समस्तं जगत् ।
तस्मै श्रीगुरुमूर्तये नमइदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ४ ॥

याचा मथितार्थ — एखाद्या तेजस्वी महादीपावर, ज्याला नाना छिद्रें आहेत असा, पट पालथा घातला, म्हणजे त्या छिद्रांतून प्रकाश बाहेर पडतो, व त्या प्रकाशाच्या किरणांत असलेले पदार्थ दिसतात, त्याप्रमाणें, अन्तर्यामीच्या ज्योतीच्या प्रकाशाच्या आधारें, चक्षुरादि इंद्रियद्वारा, प्रकाश बाहेर पडून, मी जाणलें, मी पाहिलें, मी हुंगलें, वगैरे व्यवहार सर्व जगतांत घडतात. पुढेंचा दृष्टांत देतांना हा आचार्यांचा दृष्टांत समर्थांचे मनापुढें असणें शक्य आहे.

आवध्या जगास वांचविती । म्हणोनि नामें जगज्जोती ।
ते गेलीया प्राणी मरती । जेथील तेथें ॥ १०-९-१८

ज्योती या शब्दाचा अर्थ, अंतरस्थाचा ज्ञानप्रकाश, असा घ्यावयाचा, हें आतांपर्यंत आपण पाहिलें. या ज्योतीच्या आधारावर च, प्रत्येक प्राणीमात्रांचे, यचावत व्यवहार चालतात, तर सर्व जगताची ती ज्योती झाली, म्हणून तिला जगज्जोती, म्हणण्यास काय हरकत आहे ? प्राणीमात्राचे व्यवहार, नेहमीं सहेतुक असतात. आपलें कल्याण व्हावें, हा त्यांत मुख्य हेतु असतो, हें थोडें बारकाईनें निरीक्षण केल्यास, सहज पटण्यासारखें आहे. एखादें पुस्तक आपण वाचीत असतां, सुईच्या अग्राहून हि सूक्ष्म, असा एखादा जीव, उघडलेल्या पानावरून चालत असतो. त्याला घालविण्यासाठीं आपण फुंकर घातला, तर तो प्राणी प्रथम पानाला चिकटून बसतो, व फुंकर थांबतां च, निवाऱ्याचे जागी निघून जाऊं लागतो. या एका गोष्टींत असें दिसून येतें कीं, स्वतःला कसें तरी करून वाचवावें, त्याकरितां फुंकर आहे तोवर पानाला चिकटणें च सोईचें आहे, मग मात्र एक क्षणाचा विलंब लावल्यास धोका आहे, इत्यादि सर्व विचार, त्या प्राण्याला सुचतात व हे अनेकविध विचार त्याचे ठिकाणीं आत्मज्ञान — ज्योती — जाणीव आहे, त्यामुळें सुचले व त्या जीवानें आपलें कल्याण पाहिलें. सूर्यादि बाह्य प्रकाशक आहेत पण ही अंतःस्थ ज्योती नसती तर काय परिणाम झाला असता ? समर्थ मग सांगतात तो च—

ते गेलिया प्राणी मरती । जेथील तेथें ॥ १०।९।१८

ही ज्योती प्राणीमात्रांत ठेवलेली आहे.

येक जाणीव वांटली । प्राणीमात्रास विभागली ।
जाणजाणों वांचविली । सर्वत्र काया ॥ १० — ९ — १४
तयेचें नांव जगज्जोती । प्राणीमात्र तिचेन जिती । १५
पक्षी श्वापद किडामुंगी । कोणी येक प्राणी जगीं ।
जाणीव खेळे त्याचा आंगीं । निरंतर ॥ १६

जाणोनी काया पळविती । तेणें गुणें यांचती ।
दडती आणि लपती । जाणजाणों ॥ १७

' आवघ्या जगास यांचविती ', हा समर्थांचा चरण, ज्योतीचे सर्व उपयोग ज्यांत एकत्र सामावले जातात, असा मोठा सुंदर, व अर्थगांभिर्यानें भरलेला, असा उतरला आहे. ' प्रज्ञानं ब्रह्म ', असें ऋग्वेदाचें महावाक्य आहे. त्याचा अर्थ समजून देण्याकरितां विद्यारण्यांनीं, माहावाक्य विवेकांत, प्रथमचा श्लोक घातला आहे कीं,

येनेक्षते शृणोतीदं जिघ्रति व्याकरोति च ।
स्वाद्वस्वादू विजानाति तत्प्रज्ञानमुदीरितम् ॥ ५-१

प्राणी ज्याच्या योगानें पाहातो, ऐकतो, वास घेतो व बोलतो, आणि मिष्ट अमिष्ट जाणतो, तें प्रज्ञान, असें सांगितलें आहे. या श्लोकाचा अर्थ, सर्वांच्या सर्व ज्यांत बसेल, व आपखी हि अनेक क्रिया सामावल्या जातील, अशा स्वरूपाचा समर्थांचा वरील लहानसा चरण, मूळ ' प्रज्ञानं ब्रह्म ' या वाक्याइतका च सुटसुटीत व अर्थपूर्ण झाला आहे. प्रज्ञान म्हणजे जगज्जोती च. ' यांचविती ' या एका शब्दानें, प्राणिमात्राच्या सर्व क्रिया सहेतुक व स्वकुशलार्थ असतात हें ध्वनित झालें आहे. शंकराचार्यांचा, आत्मबोधांतला

आत्मचैतन्यमाश्रित्य देहेन्द्रियमनोधियः ।
स्वकीयार्थेषु वर्तंते सूर्यालोकं यथा जनाः ॥ १९

हा हि श्लोक; देह इन्द्रिय, मनबुद्धि यांचे आपआपल्या अर्थाचे व्यापार आत्मचैतन्य जगज्ज्योतीच्या आधारावर च, जसे सूर्यप्रकाशानें प्राणी व्यवहार करतात, तसे चालतात असें सांगितलें आहे. तें सांगणें, समर्थांचें वरील ' आवघ्या जगास यांचविती ' यांत सांगून झालें आहे.

जगज्जोती या शब्दाची बरोबर कल्पना झाल्यावर, त्यापासून प्रत्येकानें आपल्या मनाशीं विचार करावा, कीं माझ्या हातून घडणाऱ्या क्रिया, जर सर्व— " ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः " या वचनाप्रमाणें आत्मअंशाच्या आधारावर घडत आहेत, तर मी अमुक करतों तमुक करतों, हे देहबुद्धीच्या अहंकारानें होणारे प्रलाप, किती व्यर्थ आहेत. म्हणून

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।

भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया ॥ गीता १८-६

या श्लोकाचें तात्पर्य ध्यानीं आणून " तमेव शरणं गच्छ सर्व भावेन भारत । " या उपदेशाप्रमाणें आपण वागलों, तर च जगज्योतीचा अर्थ समजला व पटला, असें म्हणतां येईल. नाहीं तर " आश्चर्यमस्य पश्यंति नतं पश्यंति केचन " या बृहदारण्यकांतील वचनाप्रमाणें, त्या जगज्जोतीची मुळींच आठवण हि न ठेवतां, सर्व ज्ञानाच्या फायद्याचा आनंद मात्र उपभोगावयाचा, हें स्तेनाचें लक्षण ठरेल. म्हणून च संत कबीर सांगतात कीं :

नजर न हि आवे आतमजोती ।

तेव्हां असी चूक होऊं नये म्हणून

देहेबुद्धि ते आतमबुधी करावी । म. श्लो. १६३

विवेकें तया वस्तुची भेटि घ्यावी । म. श्लो. १७०

यांत च कल्याण आहे.

| लेखनकाल | प्रसिद्धीकाल |
| --- | --- |
| १८६४ भाद्रपद शुद्ध ४ | १८६४ मार्गशीर्ष शुद्ध ९ |
| १४ सप्टेंबर १९४२ | १६ डिसेंबर १९४२ |



( २० )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# " श्रीसमर्थहृदय " वाचून आलेल्या कांहीं शंका

## — हप्ता दुसरा —

( लेखक – रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापूर )

### शंका सातवी

मनोबोधाच्या रचनाकालासंबंधींची. ' हृदय'कारांनी श्रीसमर्थांच्या ग्रन्थांचा अनुक्रम ठरवितांना, मनोबोध दासबोधाच्या आधीं झाला असावा असें अनुमानिलें आहे. त्यांचें हें अनुमान ग्रन्थरचनेच्या सोकर्याच्या दृष्टीनें त्यांनीं केलें आहे, असें ते ' हृदया ' च्या पृ. १७ वर म्हणत आहेत. हें त्यांचें मत गृहीत धरल्यास, तें त्यांच्या च एका विधानाच्या विरुद्ध जातें, असें वाटतें. ' श्रीमनाचे श्लोक ' या प्रकरणांत ( हृ. पृ. २२८ ) ते म्हणतात कीं, ' महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना झाल्यानंतर या श्लोकांची रचना झालेली असल्यामुळें ' इ. आतां वाचकांस माहीत आहे कीं, स्वराज्यस्थापना झाली शके १५९६ आनंदनाम संवत्सरीं. श्री. देवांच्या मतें दासबोधाची रचना झाली शके १५८१ मध्यें, म्हणजे स्वराज्यस्थापनेच्या आधीं १५ वर्षें. तत्पूर्वी मनोबोध झालेला. त्यांच्या मतें दासबोध हा श्रीसमर्थांचा शेवटचा ग्रन्थ. तो तर स्वराज्यस्थापनेच्या आधीं झालेला व त्याच्या आधींचा मनोबोध. अशी वस्तुस्थिति असतांना " स्वराज्याची स्थापना झाल्यानंतर या श्लोकांची रचना झालेली " आहे या त्यांच्या विधानाची व त्यामुळें होत असलेल्या परस्परविरोधाची संगति कशी लावावयाची हा प्रश्न आहे.

मनोबोधाच्या रचनाकालसंबंधानें ' दासविश्रामधाम ' कारांच्या मताचा हि येथें विचार करावासा वाटतो. ' धामा ' च्या २५ व्या ' दशका ' त याचा उल्लेख आलेला आहे. श्रीसमर्थ करवीरास गेले असतांना कल्याणास त्यांनीं त्यांच्या मामाकडून मागून घेतलें. हा प्रसंग शके १५६७ मधील आहे. या मुक्कामांत श्रीसमर्थ पंचगंगेच्या तीरीं राहात असतांना श्रीदत्तात्रेयांची व त्यांची गांठ पडली

व त्यांच्या च आज्ञेवरून श्रीसमर्थांनीं मनाचे श्लोक रचले, अशी कथा आत्माराम महाराज सांगत आहेत. ही कथा खरी मानल्यास तिच्यावरून पुढील अनुमानें संभवतात. तीं अशीं:— ( १ ) मनोबोधाची रचना करवीरास पंचगंगेच्या तीरावर झाली, ( २ ) ती बहुधा कल्याणांच्या हस्तें च लिहविली गेली, ( ३ ) कल्याणांनीं श्रीसमर्थांचा पहिला ग्रंथ जो लिहिला तो मनोबोध च होय व ( ४ ) त्याचा काल शके १५६७ होय. सारांश, आत्माराम महाराजांचें हें मत ' हृदय ' कारांच्या विरुद्ध जात आहे. तेव्हां खरें निर्णयात्मक मत याबाबत कोणतें ?

## शंका आठवी

श्रीसमर्थ केव्हां निजत याबद्दलची. याची ' टीक, जाभई, खोकला । इतुक्या काळ वेर्थ गेला ' असे मानणारे व तसम वागणारे श्रीसमर्थ निजत तरी किती असणार म्हणा ! पण आपणांस करून घ्यावयाची आहे त्यांच्या चरित्राची यार्थत माहिती. म्हणून हे प्रश्न उद्भवतात व त्यांची चर्चा करणें भाग पडतें. या प्रश्नाबाबत ( निद्रेच्या ) श्रीसमर्थ स्वतः च आपण सांगत आहेत कीं,

> सुषुप्तीअवस्थेसि भूमी निजावें ।
> उसें रामपाद स्मरोनी धरावें ।
> दिशांचा महापट तो पांघरावा ।
> सिताकार्णें साह्य वन्ही करावा ।। करुणाष्टकें ७९–१४

या श्लोकांत भूमितल ही आपली शय्या, प्रभूंचे पाय ही च आपली उशी, दशदिशा हें च आपलें पांघरूण असें ते सांगत आहेत. तसें च शीतनिवारणार्थ अग्नीचें साहाय्य आपण घेतों असें हि ते म्हणत आहेत. या शेवटच्या ओळीवरून ते जें थोडेंबहुत निजत तें रात्रीं च असावें असें ठरत आहे व हें त्यांचें म्हणणें गिरिधरांनीं त्यांचें जें वर्णन केलें आहे त्याला विरुद्ध जात आहे. म्हणून आमची शंका. गिरिधर म्हणतात —

> समर्थासी माध्यान्हीं निद्रा कांहीं ।
> रात्रीं निद्रा कचित नाहीं ।
> आम्ही निद्रेसी जातो म्हणोनि पाहीं ।
> लोकांसी आज्ञापिती जावया ।। प्रताप १८-२

यांत श्रीसमर्थ दोन प्रहरीं थोडेसें निजत, रात्रीं कचित च असें गिरिधर म्हणतात. गिरिधरांनीं श्रीसमर्थांचा दिनक्रम पाहिलेला असतां श्रीसमर्थांच्या स्वतःच्या वर्णनांत व त्यांच्या श्रीसमर्थांच्या वर्णनांत विसंवादित कां, अशी शंका ?

## शंका नववी

मनोबोधाची रचना कोणत्या हेतुस्तव झाली या संबंधींची. यावद्दल ' दासविश्रामधामा ' च्या २५ व्या ' स्तबकां ' त पुढील प्रकारें वर्णन आढळतें :—

नदितटीं असतां दास महाराज । तेथें भेटला अनुसूयात्मज ।
द्वैतभावेंसी पळाली लाज । निजीं निजकाज साधलें ॥ १०७
मुनिनाथ ह्मणे वा पंचघर भिक्षा । पळत करावी हे धरिली दीक्षा ।
भाविक जनाची न पुरे वांछा । अभक्त ते काय जाणती ॥ ८
न सुटे संसारिया व्यवसाय फंदा । निमग्न असती धंदेंत सदा ।
किमपि न सुचे त्या धर्ममर्यादा । बळें चि सन्मार्गी त्या लाविजे ॥ ९
दुष्ट दुर्जना करूं संहार । अवतार धरितो रमावर ।
धर्म स्थापाया तेंवि साचार । आजन्म जन्म तुमचा कीं ॥ ११०
होताल फार सांप्रदाई । भिक्षाधारें चालिजे सर्व हि ।
अवकाश भिक्षेला नेम पाहीं । श्लोकेक ह्मणावा घरासी ॥ ११
तरि श्लोकग्रंथातें रचोनि नेमें । आदीं श्रीरघुवीर-समर्थ-नाम ।
स्मरोनि श्लोकैक ह्मणोनि संभ्रमें । मग जय जय राम स्मरावा ॥ १२
तितुक्यांत आणिला ध्यायीं भीक । मागिलां पुतोनि जावें हरिखें ।
मानलें दासा मुनिदत्तवाक्य । नमोनि चालिले फिरत पैं ॥ १३

वरील ओव्यांचा मथितार्थ असा आहे कीं, कोणे एके समयीं करवीरास पंचगंगेच्या तटाकीं श्रीदत्त व श्रीसमर्थ यांची गांठभेट झाली. एकमेकांस पाहतांच परस्परांचा द्वैतभाव गळाला व उभयतांनीं आत्मसुख भोगलें. त्यावेळीं श्रीदत्तात्रेय श्रीसमर्थांस ह्मणतात कीं, " तुमच्या पळत पळत पांच घरीं भिक्षा मागण्याच्या पद्धतीमुळें भाविक जनांचें मनोगत पूर्ण होत नाहीं, अभक्तांस तर तुमचा थांग लागणें शक्य नाहीं, संसारी लोक आपल्या च व्यवसायांत गढलेले, तेव्हां त्यांस परमार्थ पारखा च असणार, अशा लोकांस बळें बळें च परमार्थोन्मुख करण्याचें काम तुमचें आहे, श्रीहरि ज्याप्रमाणें दुर्जनांचा संहार करून धर्मस्थापना करतो त्याप्रमाणें च धर्मस्थापनेकरितां च तुमचा हि जन्म आहे, तुमचा सांप्रदाय फार वाढणार आहे व तो केवळ भिक्षेवर च चालणार आहे, ती भिक्षा प्रत्येक घरापुढें एक श्लोक ह्मणून तुह्मी मागत जावी असा नेम मी तुह्मांस करून देतों, यासाठीं तुह्मी एक श्लोकबद्ध ग्रंथ रचावा,

भिक्षेच्या आरंभीं जय जय रघुवीर समर्थ म्हणावें व मग एक श्लोक म्हणावा. नंतर जय जय राम असा जयघोष करावा व येवढ्या अवधींत भिक्षा न आली तर संतुष्ट चित्तानें पुढील घरीं ती मागण्यास निघा." या कथेवरून मनोबोध कां व कोणाच्या सांगण्यावरून रचला गेला हें सिद्ध होत आहे. त्याचा काल व स्थल याबद्दल वर उल्लेख येऊन गेला च आहे. मनोबोधाच्या रचनेच्या या कथेचा उल्लेख आजवर कोणी केल्याचें दिसून येत नाहीं.

या ग्रन्थाच्या रचनेसंबंधानें आणखी एक आख्यायिका प्रचलित आहे. के. पांगारकरांनीं ती आपल्या -सार्थ व सभाष्य मनाच्या श्लोकांच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत दिली आहे. 'हृदया' वरील आपल्या अभिप्रायांत 'केसरी' नें हि तिचा उल्लेख केला आहे. ती थोडक्यांत अशी – चाफळास श्रीरामचंद्रजींचा उत्सव जेव्हां चालू झाला, तेव्हां प्रारंभीं त्याचा खर्च शिष्यगणाच्या भिक्षेवर व श्रीशिवछत्रपतींच्या देणगीवर चालत असे. असा क्रम कांहीं वर्षे चालल्यानंतर एके वर्षी छत्रपतींकडून यावयाची सामग्री आली नाहीं. साहजिक च शिष्यमंडळी काळजींत पडली. कारण उत्सव वाढत्या प्रमाणांत होऊं लागला होता. त्याचा खर्च केवळ नित्याच्या भिक्षेवर भागण्यासारखा नव्हता. त्या विशिष्ट वर्षाचा उत्सव तर अगदीं थोडक्या दिवसांवर येऊन ठेपला होता. तेव्हां आतां कसें करावें हें विचारण्यास श्रीसमर्थांकडे मंडळी गेली. त्यांनीं सांगितलें कीं, ज्याचा उत्सव त्यास त्याची काळजी. असें म्हणून एके दिवशीं रात्रीं कल्याणांस लेखनसामग्री घेऊन जवळ बोलाविलें व एका बैठकींत सबंध मनोबोध त्यांस सांगितला. कल्याणांनीं त्याच्या कांहीं प्रती करून निरनिराळ्या शिष्यांस त्या देऊन सभोंवतालच्या खेड्यापाड्यांत ते पाठ म्हणत भिक्षा मागण्यास पाठविलें. भिक्षेच्या या नव्या उपक्रमामुळें भिक्षा त्या वर्षी कल्पनेबाहेर आली व उत्सव यथासांग पार पडला. अशा रीतीनें चाफळचा एक वर्षाचा उत्सव जगास मनोबोध देण्यास कारणीभूत झाला.

'हृदया' मध्यें या ग्रन्थाच्या रचनेसंबंधीं अशा प्रकारची विशेष चर्चा केलेली नाहीं. ग्रन्थकार येवढें च म्हणतात कीं, महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन झाल्यानंतर हे श्लोक रचले गेले. तसें च ते एका च दिवशीं एका च बैठकींत श्रीसमर्थांनीं सांगितले व कल्याणांनीं उतरून घेतले. यांतील पहिल्या विधानावर काय अडचणी येतात त्याचा विचार वर करण्यांत आला च आहे. या नंतर प्रश्न राहिला वरील दोन आख्यायिकांचा. त्यांतील खरी कोणती, का दोनी हि टाकाऊ, ही आमची शंका. विद्वान वाचक याचा उहापोह करतील च.

## शंका दहावी

श्रीसमर्थांनीं पुरश्चरण कशाचें केलें या विषयींची. पृ. ५५२ वर 'हृदय' कर्त्यांनीं हा प्रश्न उपस्थित करून असें म्हटलें आहे कीं, "मला वाटतें त्यांनीं

पुरश्चरण केलें गायत्री मन्त्राचें व त्रयोदशाक्षरी मन्त्र एरव्हीं अखंड जपला असावा " असें म्हणून या आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ एका पदाचा आधार दिला आहे. देतांना तो दूरचा आहे असें त्यांनीं स्वतः च म्हटलें आहे.

या विशिष्ट प्रश्नासंबंधीं आम्हांस वरें च लिहावयाचें आहे. पण तें 'हृदय' कारांचा श्रीसमर्थांच्या चरित्राचा पहिला खंड प्रसिद्ध झाल्यावर लिहितां येईल. कारण, या विषयाची चर्चा त्यांत सविस्तर केलेली असणार. तूर्त येथें च लिहितों कीं, 'हृदय' कारांचें वर उद्धृत केलेलें म्हणणें मान्य केल्यास त्यांत कांहीं अडचणी संभवतात. श्रीसमर्थांस लहानपणीं च त्रयोदशाक्षरी मन्त्राचा उपदेश झाला असतांना, गायत्रीचें पुरश्चरण करण्याचें कारण च काय ? सद्गुरूंनीं दिलेलें नाम सोडून इतर गोष्टींकडे ते पाहतील च कसें ? श्रीसमर्थांनीं नामस्मरणाबद्दल आपल्या ग्रन्थांत शंकडों नव्हे तर हजारों वेळां जे उल्लेख केले आहेत ते पाहिले म्हणजे असें वाटतें कीं, नित्यनैमित्तिक संध्या इत्यादिकांपुरता च गायत्री मन्त्र त्यांनीं जपला असावा, बाकीचा सर्व वेळ त्रयोदशाक्षरी नामस्मरणांत च सर्व गेला असावा. नामस्मरणाबद्दल त्यांनीं जितक्या वेळां सांगितलें आहे त्याच्या कितीतरी पटीनें कमी वेळां गायत्री पुरश्चरणाबद्दल सांगितलें आहे.

या ठिकाणीं आणखी हि एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, श्रीसमर्थांनीं त्रयोदशाक्षरी मन्त्राचा तेरा कोटी जप आपल्या तपश्चर्येच्या कालीं केला असें सर्वजण मानीत आलेले आहेत. आमच्या मतें टांकळीचा बहुतेक सर्व काळ श्रीसमर्थांचा या नामस्मरणांत खर्च झाला असला पाहिजे. तो इतका कीं, प्रत्येक दिवशीं श्रीसमर्थांनीं यासाठीं कमींत कमी १८ ते २० तास खर्चिले असले पाहिजेत. नाहींतर १२ वर्षांत इतका जप होणें अगदीं असंभवनीय आहे. प्रत्यहीं नामस्मरण करण्याचा ज्यांना थोडा बहुत अभ्यास आहे, त्यांना आमचें म्हणणें पटेल असें वाटतें. तेव्हां तेरा कोटी जपाला जेथें बारा वर्षे पुरण्याची च मारामार तेथें श्रीसमर्थांना गायत्री पुरश्चरण करण्यास अवकाश तरी कोठून मिळणार!

'हृदय' कारांनीं लेखांक २०४ (श्रीसांप्रदायिक वृत्त चर्चा वगैरे) मध्यें तपश्चर्येच्या कालांतील श्रीसमर्थांचा दिनक्रम काय असावा याबद्दल पुढील प्रमाणें लिहिलें आहे:—

" पंचवटीजवळ कोस दीड कोस टांकळी म्हणून एक स्थान आहे, तेथें राहून १५४२ ते १५५४ बारा वर्षे त्यांनीं तीव्र तप केलें, तेथें गोदावरीला एक लहानशी नदी मिळते, त्या संगमापाशीं दुपारचे बारा वाजेपर्यंत त्यांनीं गायत्री मन्त्राचें पुरश्चरण करावें, नंतर पंचवटीस जाऊन मधुकरी मागावी, ती रामाला अर्पण करून सेवन करावी, तिसऱ्या प्रहरीं स्वतःशीं किंवा समवयस्क आणि समधर्म मित्रांसमवेत लेखन, वाचन, चिंतन करावें, सायंकाळीं श्रीरामापुढें चें पुराण किंवा जी चर्चा चाले

ती श्रवण करावी आणि रात्रींचा काल आपण व आपला राम अशा दोघोंनीं मिळून आनंदांत कंठावा. " ' हृदयां ' मध्यें हि याच कालाचें वर्णन पुढील प्रमाणें केलेलें आहे:— " मला वाटतें या च काळांत वेद आणि वेदान्त, अनेक गीता, भागवतादि नाना ग्रन्थ यांचें त्यांना अध्ययन घडलें असावें. वाल्मीकी रामायणाचीं कांहीं काण्डें त्यांनीं उतरलीं, ती याच काळांत होत. हा काळ १५४२ ते १५५४ चा होय. " ( श्रीस. हृ. पा. ४०७ ). इतर चरित्रकारांनीं या कालांत श्रीसमर्थांच्या अंगीं आणखी हि कांहीं गोष्टी चिकटविल्या आहेत. पण प्रस्तुत स्थळीं आह्मांस त्या इतरांशीं कर्तव्य नसून ' हृदय ' कार काय ह्मणतात व तें कितपत समर्थनीय ठरतें, येवढ्याचा च विचार कर्तव्य आहे. तो विचार करीत असतांना असें ह्मणावेंसें वाटतें कीं, त्यांनीं तपश्चर्येच्या कालांतील श्रीसमर्थांच्या दिनक्रमाचें, त्यांनीं केलेल्या अनेक व्यवसायाचें जें वर्णन दिलें आहे ती केवळ कविकल्पना च वाटते. आमची त्यांस नम्र प्रार्थना आहे कीं, त्यांनीं या बारा वर्षांचे दिवस, तास, मिनिटें व सेकंडें यांचा हिशोब करून, दर सेकंडास किंवा किती सेकंडास, श्रीसमर्थांनीं सांगितलेल्या पद्धतीनें जप केल्यास, एक त्रयोदशाक्षरी नाम पडतें व याप्रमाणें बारा वर्षांत किती जप होतो याचें गणित करावें, भोजन, निद्रा इ. देहधर्मांस लागणारा काळ त्यांत घ्यावा व मग वर उद्धृत केलेल्या अनेक गोष्टी श्रीसमर्थांस करणें शक्य होतें कां, तें आपल्या मनाशीं च ठरवावें. आमचें स्पष्ट मत, यावावत, असें कीं, श्रीसमर्थांनीं तपश्चर्येच्या बारा वर्षांच्या कालांत १३ कोट त्रयोदशाक्षरी मन्त्राव्यतिरिक्त कांहीं हि दुसरा उद्योग केला नाहीं, तो करणें त्यांस शक्य च नव्हतें, त्यांचा सर्वच काल, दिवसाचे १८ ते २० तास किंबहुना जास्त च, अखंड नामस्मरणांत गेला असला पाहिजे. इतर कोणत्या हि व्यवसायांत गेला नसला पाहिजे. तो तसा गेला असेल असें मानलें तर तेरा कोटी जपास १२ वर्षे पुरणें शक्य नाहीं. पण आमचें तर ठाम मत असें कीं श्रीसमर्थांनीं या च काळांत तेरा कोटींचें पुरश्चरण संपविण्याची पराकाष्ठा केली असली पाहिजे व ती करून साक्षात्कार करून घेतला असला पाहिजे. यास साक्ष त्यांचा च

आज्ञेप्रमाणें परमार्थ । केला जाण त्यां यथार्थ ॥

हा अभंग आहे. त्यांची यांत साक्षात् प्रचीति आहे. तेव्हां हा अभंग खरा मानावयाचा झाल्यास ( आह्मांस तो तसा निश्चित वाटतो ) श्रीसमर्थांनीं तेरा कोटींचा जप शके १५४२ ते १५५४ या कालांत प्रामुख्यानें केला, दुसरा कोणता हि केला नाहीं, त्यांत च त्यांचा बहुतेक काळ व्यतीत झाला, ' हृदय ' कारांनीं व इतर चरित्रकारांनीं या कालांतील श्रीसमर्थांच्या लेखन, वाचन, राजकारण इत्यादि अनेकविध व्यवसायांचें जें वर्णन केलेलें आहे तें श्रीसमर्थांच्या अंगीं किती हि

अमानुष सामर्थ्य होतें असें मानिलें तरी, अशक्य आहे, असें आमचें निश्चित मत आहे. ' हृदय ' कारांनीं व इतर विद्वानांनीं याचा शांतपणें विचार करावा अशी त्यांस नम्र विनंति आहे.

## शंका अकरावी

पृ. ५३१ वर पुढील वाक्य आहे. " महाराष्ट्राबाहेर ते जेव्हां संचार करीत, विशेषतः उत्तर हिंदुस्थानांत जेव्हां ते ( श्रीसमर्थ ) जात " इ. येथें शंका अशी कीं, पर्यटनाच्या कालानंतर श्रीसमर्थ पुनः उत्तर हिंदुस्थानांत केव्हां गेले होते, कितीदां गेले होते व कोठें कोठें गेले होते ? या गोष्टी सिद्ध करावयास कांहीं ऐतिहासिक प्रमाणें आहेत काय ? किंवा ग्रन्थकारांचें हें केवळ अनुमान आहे ? ग्रन्थकारांच्या मताप्रमाणें श्रीसमर्थ हे राष्ट्रपुरुष होते, प्रत्येक राष्ट्रपुरुषाला हिंदुस्थानी भाषा अवगत असणें अगत्याचें होतें, तशी ती श्रीसमर्थांना येत होती, त्या भाषेंत त्यांचीं कांहीं पदें हि आहेत, त्यांत कुराणाचा हि उल्लेख आहे, यावरून ते मुसलमानां-पुढें हि कीर्तन करीत असावेत व त्या साठीं ते उत्तर हिंदुस्थानांत जात असावेत अशी तर्कसरणी ग्रन्थकारांची आहे कीं काय ? श्रीसमर्थ राष्ट्रपुरुष होते यांत शंका च नाहीं. पण या एका गोष्टीवरून पुढील गोष्टी ज्या तर्किल्या गेल्या आहेत, त्यांस बळकट ऐतिहासिक पुरावा पाहिजे. ग्रन्थकारांच्या विधानांत श्रीसमर्थांचें उत्तर हिंदुस्थानांत जाणें अनेकवार झालें असल्याचें ध्वनित होत आहे. आम्हांस तसें वाटत नाहीं. शके १५६६ त श्रीसमर्थ महाराष्ट्रांत जे आले, त्यानंतर ते महाराष्ट्र सोडून फारसे बाहेर गेले च नाहींत. उत्तर हिंदुस्थानांत तर मुळीं च गेले नाहींत. एकदां पंढरीचंदावरकडे दक्षिणेंत मात्र ते गेले होते. त्यांस जें कार्य करावयाचें होतें, तें त्यांनीं महाराष्ट्रांत च केलें व शिष्यांकरवीं बाहेरील प्रांतांतील करविलें. पर्यटनांत बाहेरील प्रांतांचें त्यांनीं अवलोकन करून ठेविलें च होतें व आपल्या माणसांकरवीं आवश्यक ती माहिती त्यांस दुसऱ्या प्रांतांतील मिळत च होती. तेव्हां ते उत्तर हिंदुस्थानांत प्रचारास जात असत इत्यादि केवळ अनुमानें च होत.

यावर अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, मग श्रीसमर्थ हिंदुस्थानी शिकले च कां ? श्रीसमर्थांसारखा कांटेतोलपणानें वागणारा माणूस या उठाठेवींत पडेल च कसा ? याचें उत्तर असें आहे, दक्षिणेंत मुसलमानी राज्यें कांहीं कमी नव्हतीं. त्यांच्या दरबारची भाषा मुसलमानी होती. मुसलमानी पीर, औलिया इत्यादिकांचा आपला धर्म वाढविण्याचा प्रचार राजसत्तेच्या बळावर सरोस चालू होता. त्याला आळा घालण्यासाठीं श्रीसमर्थ कुराण व त्याची भाषा शिकणें अगदीं संभवनीय आहे. या निमित्तानें त्यांना दक्षिणेंत च येथील मुसलमानांशीं वारंवार प्रसंग येणें साहजिक आहे. पण ते या प्रचारकार्यासाठीं उत्तर हिंदुस्थानांत जात यास प्रमाण काय ?

## शंका बारावी

'आनंदवनभुवन' प्रकरणाच्या कालसंबंधीं पृ. १२१ वर ग्रन्थकार म्हणतात कीं "आनंदभुवन हें त्यांच्या (श्रीशिवछत्रपतींच्या) पूर्ण उत्कर्षाच्या शेवटच्या काळांतील असावें, असें मला वाटतें." ग्रन्थकारांनीं श्रीसमर्थांच्या ग्रन्थांचें स्वरूप व संभाव्य रचनाकाल हीं विचारांत घेऊन त्या त्या ग्रन्थांचा क्रम लावला आहे व त्या च क्रमांत त्यांचें विवेचन केलें आहे (पृ. ५८७ पहा). त्यांच्या विवेचनक्रमांत दासबोध शेवटचा ग्रन्थ पडत आहे व त्याचा रचनाकाल त्यांच्याच मताप्रमाणें शके १५८१ म्हणजे स्वराज्याच्या स्थापनेपूर्वीं १५ वर्षे आधीं. आतां 'आनंदवनभुवन प्रकरण व दासबोध यांच्यांमध्यें कित्ती तरी प्रकरणें आहेत. तेव्हां हें प्रकरण श्री शिवछत्रपतींच्या पूर्ण उत्कर्षाच्या शेवटच्या काळांतील असें कसें म्हणतां येईल,' अशी शंका येते.

या प्रकरणांतील अन्तर्गत पुराव्यावरून हें प्रकरण ग्रन्थकार म्हणतात त्या काळांतील च वाटतें, पण मग त्याचा अनुक्रम दासबोधापूर्वींचा कसा? याचें शंका-समाधान करें!

## शंका तेरावी

पृ. ६२ वर 'स्फुट ओंव्या' किंवा अभंग यांतील ७ व्या अभंगावरील चर्चा आहे. या अभंगाच्या तिसऱ्या चरणांत 'ग्रंथाचें अंतर विवरावें' असा उत्तरार्ध आहे. यावर ग्रंथकारांचें पुढील प्रकारें विवरण आहे. "ग्रन्थ म्हणजे दासबोध. मनांत ग्रंथ आणून जेव्हां श्रीसमर्थ नुसता ग्रंथ शब्द योजितात, तेव्हां तो शब्द ग्रंथराज दासबोधास च अनुलक्षून असतो. याचें निर्विवाद प्रत्यंतर पुढें आनंदवनभुवन प्रकरणांत आपणास मिळेल. त्याप्रमाणें येथें हि "ग्रंथाचें अंतर विवरावें" म्हणजे ग्रंथराज दासबोधाचें विवरण करावें. विवरतां विशेषा विशेष। कळों लागे॥" यावरून असें दिसतें कीं, या ७ व्या अभंगाच्या वेळीं वीस दशकी दासबोध संपूर्ण झाला असला पाहिजे. हें अनुमान गृहीत धरल्यास दासबोध हा श्रीसमर्थांचा शेवटचा ग्रंथ या अनुमानाची वाट कशी लावावयाची!

## शंका चौदावी

एकवीस समासीच्या रचनाकालसंबंधीं. पृ. २९७ वर एकवीससमासीपैकीं दुसऱ्या समासापैकीं १ ते ६ ओंव्या व त्यांतील त्यांच्या विवरणावरून त्यांनीं असा तर्क केला आहे कीं "ते (श्रीसमर्थ) घर सोडून तडक च पंचवटीस आले असावेत." तसें च "एकवीससमासी ही श्रीसमर्थांच्या पूर्ववयांतील असावी" असें हि म्हटलें आहे. येथील पूर्ववयांतील हा शब्दप्रयोग जरा संदिग्ध वाटतो. दुसऱ्या समासावरून जर ते पंचवटीस तडक च आल्याचें ठरलें, तर या

एकवीससमासीचा काल जास्तींत जास्त श्रीसमर्थांच्या १५ व्या वर्षाचा दिसतो. पंचवटीस आल्यानंतर एकवीससमासीस जास्तींत जास्त तीन वर्षांचा काल लागला असावा. म्हणजे श्रीसमर्थ नुकते च तारुण्यांत पाऊल टाकूं लागले होते. पण हा कांहीं त्यांच्या भर तारुण्याचा काल नव्हे. पण ग्रंथकारांनीं तर एकवीससमासीचा काल तो च ठरविला आहे ( पृ. २९८ ). त्यांचा हा काल गृहीत धरल्यास ( म्हणजे श्रीसमर्थांचें २० चें पुढील २४ पर्यंतचें वय धरल्यास ) असें विचारावेसें वाटतें कीं, ज्या एकवीससमासीला पंचवटीस येऊन फार काल झाला नाहीं तों च प्रारंभ होतो, ती संपावयास काय ८।१० वर्षें लागलीं ? अवघे पंचवीस समास लिहावयास काय इतका काल लागला ?

एकवीससमासी ही जर पंचवटीस च रचली गेली असें मानलें, तर आणखी एक अडचण उभी राहते. ती अशी कीं, या कालांत सुद्धां श्रीसमर्थांचा शिष्य-समुदाय बरा च वाढला असावा, ते पुष्कळ प्रसिद्धीला आले असावेत.

तुवां पाषाण तारिले । तरी आम्ही जडजीव उद्धरिले ।
तुवां देव मुक्त केले । बंधनापासुनी ॥ १६-५
तरी आम्ही हि भाविकांसी । सोडउनीयां मोक्षपदासी ।
पावविलें तयांसी । मागुता जन्म नाहीं ॥ ६

× × × ×

तुंवा पुरी नेली वैकुंठा । तरी आम्ही वैकुंठीच्या बारा वाटा ।
करूनि मांडिला चोहटा । तया वैकुंठाचा ॥ ८

या ओंव्या आमच्या म्हणण्यास पुष्टिकारक नाहींत काय ? ग्रंथकारांनीं पृ. २९७ वर " जगविख्यात झाल्यावर, ते पिसाटासारखे कोणाला भासणार व त्यांना हीनरूपानें कोण उभे राहूं देणार ? " असें जें म्हटलें आहे तें बरोबर नसावें व त्यावरून एकवीससमासी हा ग्रंथ श्री समर्थांच्या पूर्व वयांतील — तारुण्यांतील असावा — असें जें तर्किलें आहे तें बरोबर नसावेसें वाटतें. आम्हांस तर असें वाटतें कीं, एकवीससमासी ह्या ग्रंथरचनेच्या वेळीं श्रीसमर्थ जगाच्या पुढें बरेच आलेले असावेत व त्यांचा शिष्यसंप्रदाय हि बराच वाढलेला असावा. तसें च हा ग्रंथ पंचवटीच्या कालांतील नसावा. कारण या कालांत श्रीसमर्थ फार प्रसिद्धीला आले नव्हते व त्यांचा शिष्यसमुदाय हि या कालांत फारसा वाढलेला होता, असें सिद्ध करण्यास प्रमाणें हि पुढें आलेलीं नाहींत.

" जगविख्यात झाल्यावर, ते पिसाटासारखे कोणाला भासणार " हें ग्रंथ-कर्त्यांचें विधान त्यांच्या दासबोधाच्या प्रस्तावनेंत हि आलेलें आहे. " चाफळखोऱ्यांत

श्रीसमर्थ आल्यानंतर त्यांनीं काय काय केलें यांचें चरित्रांतून जें वर्णन आलें
आहे त्यावरून असें दिसतें कीं, आरंभीं, कित्येक वर्षें त्यांनीं दऱ्याखोऱ्यांतून
हिंडण्यांत काढलीं. गांवांत हि ते क्वचित् येत, पण आले तरी त्यांचें वर्तन
पिसाटासारखें असे, " असें म्हणून

जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित ।
अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १४ – ७ – १५

श्रीसमर्थ घोर दिवस श्रीसमर्थ वागले असतील किंवा लोकांना दिसले
कांकडखोऱ्यांत आल्यावर थोडे दिवस श्रीसमर्थ वागले असतील किंवा लोकांना दिसले
असतील प्रसिद्धासारखे, पण शके १५८१ मध्यें तर ते नव्हते ना पिसाटासारखे ?
या वेळीं तरी ते जगविख्यात झाले होते ना ! मग ही ओंवी त्यांच्या तोंडून कां
बरें बाहेर पडली ? आमच्या म्हणण्याचा आशय असा कीं, पिशाच्याप्रमाणें
वागण्याच्या वृत्तीचा व त्यावरून ते प्रसिद्ध नव्हते हें सिद्ध करणें व म्हणून ज्या
ग्रन्थांत तो संदर्भ आला आहे तो त्यांच्या अप्रसिद्धिकाळांतील असावा असें
अनुमान काढणें, हा केवळ दुरन्वय होय. त्या वृत्तीचा ग्रंथकर्तृत्वाशीं संबंध
जोडणें इष्ट व योग्य हि नाहीं. तसें मानल्यास श. १५८१ मध्यें हि श्रीसमर्थ
अप्रसिद्ध होते असें मानावें लागेल. ' प्रतापां ' त गिरिधरांनीं श्रीसमर्थ कसे पहात,
कसे चालत, कसे दिसत, कसे बोलत इत्यादींचें जें वर्णन केलें आहे, तें त्यांच्या या
पिसाट वृत्तींचेंच. साक्षात्कारी पुरुषांच्या वागण्याच्या तऱ्हा अनेक असतात.
पुराणांतरीं यांचीं वर्णनें आहेत. जडभरत, शुक्राचार्य, नामदेव ही मंडळी पिशाच-
वृत्तीची च होत. हे कां त्यांच्या काळीं प्रसिद्ध नव्हते ? श्रीसमर्थ हि या च
कोटींतील. तात्पर्य ' पिसाट ' ' दीन ' या विशेषणांवरून एकवीससमासी या
ग्रंथाचा काल अनुमानणें चुकीचें आहे. तो ग्रंथ श्रीसमर्थांच्या चांगल्या प्रसिद्धीच्या
कालांतील असावा असें आम्हांस वाटतें.

आमची शंका व अनुमानें ग्रंथकारांपुढें व वाचकांपुढें ठेविलीं आहेत. त्यांची
योग्य ती चर्चा हि होईल च.

प्रसिद्धीकाळ
दि. १६ – १ – १९४३

लेखनकाळ
दि. ३ – १२ – ४२

( २१ )

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्री तुकाराम महाराजांचे गुरु कोण ?

( लेखक – रा. गणेश गोविंद कारखानीस, बी. ए., विजापूर )

खरोखर पाहतां हा प्रश्न उपस्थित होण्याचें कारण च नाहीं व तसा तो आजवर कोणी केला हि पण नाहीं. कारण, या प्रश्नाचा निर्णय श्री तुकोबारायांनीं स्वमुखानें च आपल्या त्या सुप्रसिद्ध अभंगांत केला असल्यानें या प्रश्नाकडे कोणाचें लक्ष देण्याची कोणास आवश्यकताच भासली नाहीं. श्रीतुकोबारायांचा तो अभंग असा–

सत्य गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला करू ॥
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥
कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥
बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मन्त्र दिला रामकृष्ण हरि ॥
माहो शुद्ध दशमी पाहूनी गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥

या अभंगांत श्री तुकाराम महाराजांनीं आपणांस आपल्या गुरूंचा अनुग्रह कसा झाला, त्या वेळीं काय घडलें, आपली गुरुपरंपरा कोणती व आपले गुरु कोण हें अगदीं स्पष्ट सांगितलें आहे. असें असतां हि ' त्यांचे गुरु कोण ' हा प्रश्न उपस्थित करणें वाचकांस जरा चमत्कारिक वाटेल खरें ! पण आमचा त्यास निरुपाय आहे. संशोधनांत केव्हां कोठें काय सांपडेल हें कोणी सांगावें ? तेव्हां तसें कांहीं दिसून आल्यास, तें तज्ज्ञांपुढें ठेऊन, त्याची चिकित्सा होऊन, त्याचा निर्णय लागलेला बरा, असें आमचें मत आहे. प्रचलित युग केवळ भावनेचें नाहीं. तिच्या मागें चिकित्सा पाहिजे. तेव्हां प्रत्येक गोष्ट चिकित्सेच्या कसावर लागून शुद्ध ठरल्यास तिला या जगांत मान्यता मिळणार. याच दृष्टीनें आम्ही हा प्रश्न या मासिकाच्या वाचकवर्गापुढें मांडीत आहोंत.

श्रीसमर्थ सांप्रदायांत बेकेदळ्ळीमठपती श्री आत्माराम महाराज यांची योग्यता फार मोठी मानली जाते. श्रीसमर्थांचे ते अवतार च अशी समजूत श्रीसांप्रदायात आहे. यांनीं ' श्रीदासविश्रामधाम ' म्हणून जो श्रीसमर्थचरित्रपर प्रचंड ग्रन्थ लिहिला आहे, त्याचें सर्वव्यापी स्वरूप पाहून श्री. नानासाहेब देवांनीं त्यास ' Encyclopoedia Ramadasika ' म्हणजे रामदासी सांप्रदायाचा विश्वकोश असें संबोधिलें आहे. यावरून या ग्रन्थाचें केवढें महत्त्व मानण्यांत येतें, हें वाचकांच्या लक्षांत येईल. या ग्रन्थाच्या ३९ व्या ' विसाव्यां ' त श्रीसमर्थ व श्रीतुकाराम महाराज यांच्या भेटीचा एक प्रसंग वर्णिलेला आहे. त्यांत पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे :—

पूर्ण सज्ञानी दोघे सज्जन । उभयतां श्रीहरिआज्ञा प्रमाण ।
शुद्ध येकांतीं कृपा करोन । तारक जप तुकया सांगितला ॥ ८४

संशय कित्येकां वाटेल जीवीं । उपदेश होता कीं तयास पूर्वीं ।
तरी ऐका न लाभे कैवल्य पदवी । न करितां सेवन फळ तारक ॥ ८५

हरिहर महाशक्ति मन्त्र सारांश । तारक मन्त्र हा विशेषाविशेष ।
पूर्वापूर्वींचें निजगुज रहस्य । म्हणोनि हरीनें आज्ञापिलें ॥ ८६

कां गुरु नव्हे दाविता स्वहित । आणि वाणी तो धरिला स्वपंथ ।
ब्रह्मविद ब्राह्मण दास समर्थ । गुरुपणा योग्य सहजचि ॥ ८७

बाबाजी आणि महाराजसज्जन । मुळींच असती दोघे अभीन्न ।
उपदेशकाळीं स्वरूपधारण । केलें चैतन्यासादृश्य ॥ ८८

या ओंव्या व यापुढलि कांहीं ओंव्या वाचकांनीं मूळ ग्रन्थांतून नीट मननपूर्वक वाचाव्या व आपल्या मनाचीं काय तें ठरवावें. या ओंव्यांत आत्माराम महाराज स्पष्ट म्हणत आहेत कीं, तुकोबारायांस पूर्वींचा अनुग्रह होता पण तो मोक्षार्थ पुरेसा नव्हता, म्हणून श्रीसमर्थांनीं त्यांस देवाच्या ( श्रीहरीच्या ) आज्ञेवरून तारकमन्त्राचा उपदेश दिला, तसें च पूर्वींच्या मन्त्रोपदेशाच्या वेळीं ( राम कृष्ण हरि या मन्त्राच्या वेळीं ) श्रीसमर्थांनीं च बाबाजी चैतन्यांचें रूप धारण करून तो मन्त्र तुकोबारायांस दिला, ब्राह्मण असल्यानें गुरुपणास श्रीसमर्थ साहजिक च योग्य होते इ. इ. ' धाम ' कारांचें हें म्हणणें मान्य केल्यास श्रीतुकाराम हे श्रीसमर्थांचे शिष्य ठरतात. तेव्हां ऐतिहासिक दृष्टीनें हें विधान सत्यास कितपत धरून आहे, याचा संशोधकांनीं विचार केला पाहिजे असें आम्हांस वाटतें.

श्रीतुकाराम महाराजांची आजवर बरीं च चरित्रें झालीं आहेत. पण त्यांत आत्माराम महाराजांच्या वरील उध्दृत ओंव्याकडे कोणाचें लक्ष गेलेलें दिसून येत नाहीं. महाराष्ट्रभाषाभूषण श्री. आजगांवकर, नगरचे श्री. महादेव गोविंद मोडक, मुम्बईचे ॲडव्होकेट कै. धुरंधर यांच्या तुकारामचरित्रांत या विशिष्ट प्रसंगाचा उल्लेख नाहीं. कै. पांगारकरकृत श्रीतुकोबारायांचें चरित्र, तसें च त्यांचा महाराष्ट्र वाङ्मयाचा इतिहास, यांत हि ते यासंबंधीं कांहीं नांव हि काढीत नाहींत. आपल्या 'महाराष्ट्र-सारस्वतांत' भावे याबद्दल कांहीं अक्षर काढीत नाहींत. आपल्या श्रीसमर्थ-चरित्रांत श्री. अळतेकर यांनीं या प्रसंगाचा नामनिर्देश केलेला दिसून येत नाहीं. श्री रामदास आणि रामदासी मालेंत आजवर प्रसिद्ध झालेल्या ग्रन्थांत हि संपादकांनीं व इतर विद्वानांनीं आत्माराम महाराजांच्या या विधानाबद्दल कांहीं चर्चिल्याचें स्मरत नाहीं. या सर्व लेखकांच्या दृष्टोत्पत्तीतून "धाम" खात्रीनें गेला असला पाहिजे. मग याबद्दल कोणीहि कांहीं लिहिलें नाहीं कसें ? याचें आश्चर्य वाटतें. आतां तरी या प्रश्नाकडे — श्रीतुकोबारायांचे गुरु श्रीसमर्थ या आत्माराम महाराजांच्या विधानाकडे — विद्वानांचें लक्ष जाऊन, त्याचा ते योग्य परामर्श घेतील अशी आम्हांस आशा आहे.

याच ३६ व्या 'विश्राम्यां'त श्रीतुकोबारायांचें नांव मूळचें तुका, तुकोबा, किंवा तुकपा वाणी असून त्यांस 'तुकाराम' हें नांव श्रीसमर्थांनीं देवविलें असा उल्लेख आहे. या हि गोष्टीची चर्चा व्हावयास पाहिजे. इतिहासज्ञांनीं ती करावी. ओंव्या ९४ ते ९९ यांत हा प्रसंग आहे. एक च ओंवी या संबंधींची देतों :—

> तुका तुकोबा तुकपा वाणी । वाहत होते या अभिधान जनीं ।
> सांगोनि विठ्ठला रामदासांनीं । तुकाराम नाम ठेविलें ॥ ९६

दिसण्यांत साध्या दिसणाऱ्या या गोष्टींची चर्चा ऐतिहासिक प्रमाणांनीं व्हावयास पाहिजे. तर च या ग्रन्थाचें 'रामदासी सांप्रदायाचा विश्वकोश' हें नांव अन्वर्थक होईल. नाहींतर तो सांप्रदायिक अभिमानानें प्रेरित होऊन लिहिला गेलेला असा केवळ एक भावनाप्रधान ग्रंथ ठरून त्यास योग्य तें प्रामाण्य मिळणार नाहीं.

| लेखनकाळ | प्रसिद्धिकाळ |
| --- | --- |
| दि. २६-११-४२ | १६-१-४३ |